# स्फूर्तिलहरी

( स्फुट कवितांचा संग्रह )

लेखकः—

काव्यविहारी, बुधगांव

---

प्रस्तावनालेखकः—

वि. स. खांडेकर

---

१९३६

किंमत सव्वा रुपाया

# अर्पणपत्रिका

श्रीमंत राजेसाहेब

**भवानराव श्रीनिवासराव पंडित, बी. ए.,**

**पंतप्रतिनिधि, औंध संस्थानचे अधिपति**

**यांचे चरणीं**

श्रीमंतांचा विद्याव्यासंग, कलानिष्ठा, साहित्यप्रेम,
उज्ज्वल स्वाभिमान इत्यादि श्रीमंतांच्या ठायीं
वसत असलेल्या अनेक सद्गुणांबद्दल
मला वाटत असलेल्या आद-
राचें द्योतक म्हणून या
'स्फूर्तिलहरी'

**श्रीमंतांच्या परवानगीनें सादर समर्पण करीत आहें.**

श्रीमंतांचा नम्र,

काव्यविहारी

श्रीमंत राजे भवानराव श्रीनिवासराव ऊर्फ बाळासाहेब पंडित
पंतप्रतिनिधि, संस्थान औंध, यांचा

# अभिप्राय

महाराष्ट्रशारदेचा बहुविध शृंगार सजविण्यासाठीं तिच्या अनेक भक्तांकडून जें नवीन नवीन साहित्य रोज तयार करण्यांत येत आहे, त्यांत 'काव्यविहारी' रा. गद्रे यांच्या 'स्फूर्तिलहरी' अनेकांचें चित्ताकर्षण केल्याशिवाय राहणार नाहींत, अशी आम्हांस खात्री वाटते. भोंवतालची सामाजिक, आर्थिक अगर धार्मिक तीव्र निराशाजनक परिस्थिति, समाजावर पसरलेली प्रेतकळा, आणि चोहोंकडे असलेला दांभिकपणा यांची आंच कवीच्या हृदयाला बसूनच त्याच्या स्वाभिमानी आणि आशावादी स्फूर्तीला हा आलेला कांहींसा कडवट कढ आहे. 'जाळाशिवाय कढ नाहीं' या न्यायानें स्फूर्तीवर आलेल्या ह्या लहरींचा कढ जिवंत आहे; शिळ्या कढीला आलेला उसना ऊत नाहीं, एवढें सांगितलें म्हणजे 'स्फूर्तिलहरी'चें अंतरंग समजण्यास पुष्कळ मदत होईलसें वाटतें.

मानवी समाजांत आज जो तीव्र जीवनकलह सुरू आहे, त्याचें स्वरूप पशुपक्ष्यांत चालणाऱ्या जीवनकलहाहूनही भयंकर आहे. सुधारलेल्या म्हणविणाऱ्या मनुष्यप्राण्याच्या अन्तःकरणांत यत्किंचितही पालट झालेला नसून "दुर्बल हें सबलांचें भक्ष्य" हेंच दृश्य

आजही पाहून कवीसारखें कोणाला दुःख आणि त्वेष वाटणार नाहीं ? ह्या जगाच्या अन्यायी न्यायाबद्दल कवीला वाटणारा तिटकारा त्याच्या " जगाचा न्याय ", " खार आणि घार ", " हरिणीप्रत " वगैरे कवितांतून व्यक्त झाला आहे. दुर्बलानें सबलाबरोबर जगण्यासाठीं सबलच झालें पाहिजे. त्यासाठीं " उंबरांतले किडे " होऊन किंवा सबळानें टाकलेल्या " डाळिंबाच्या दाण्यांना " न भुलतां ' मान्यांच्या मुला ' सारखें आपलें " हरपलें श्रेय " प्राप्त करून घेतलें पाहिजे.

आजच्या जगाला दांभिकतेचा रोग जडला आहे. मोकळेपणा अगर खरेपणा जगाला माहितच नाहीं. आणि जो जो समाज सुधारलेला असें आपण म्हणतों तो तो त्याच्यांत खोटेपणा अधिक. ह्या खोटेपणाबद्दल कवीला वाटणारा तिटकारा त्यानें " धर्ममार्तण्डावर " अनाहूत " उपदेश करणाऱ्यावर " व "दोन चित्रां"तील किडक्या सापांवर हल्ला करून व्यक्त केला आहे. अशा समाजकंटकांच्या लीलांना बळी पडणाऱ्या " अभागी अबले " बद्दल त्याला अनुकम्पा वाटते. अशा कृत्रिम जगांत वावरण्यापेक्षां मनमोकळ्या निसर्गांत रमण्यांत किंवा निसर्गाच्या लाडक्या खेडवळ लोकांशीं एकरूप होण्यांत त्याला वाटणारा आनंद कवीनें " मंजुळा ", " संध्याकाळीं " किंवा " मोटेवरील गाणें " यांत व्यक्त केला आहे. यावरून त्याचें सृष्टिनिरीक्षण व तिच्याबद्दल वाटणारें प्रेमही दिसून येतें.

" कलेचा शर्करापाक हेतूच्या तिळाच्या दाण्यांवर चढविल्यावांचून खरा कणदार वाङ्मयाचा हलवाच तयार होत नाहीं. " हेतूशिवाय कलाकृति म्हणजे नुसता साखरेचा गोळा होय. या कवीचें सौन्दर्याचें आणि स्फूर्तीचें ध्येय किती उदात्त आहे, हें त्याच्या " सौन्दर्य म्हणजे " आणि " स्फूर्तिदेवतेस " या कवितांवरून

व्यक्त होतें. दारू प्याल्यासारखें बेफाम न करतां जें सौंदर्य किंवा स्फूर्ति मृतराष्ट्रांत नवचैतन्याचें जीवन निर्माण करील तीच खरी स्फूर्ति आणि तेंच खरें सौंदर्य. वेळीं अवेळीं भलतींच गीतें गाणाऱ्या "सारंगीवाल्या"ची कवीनें केलेली निर्भर्त्सना म्हणजे आजच्या अनेक साहित्यभक्तांना शालजोडींतला आहेरच आहे.

रा. काव्यविहारींची भाषा अत्यंत प्रसादपूर्ण, सुबोध आणि जोरदार आहे. काव्यांत असलेली अन्तःकरणाची तळमळ आणि भावनेचा ओलावा चटकन पटतो. **आज पाहिजे असलेल्या प्रकारची ही कविता आहे**. आम्हांस चिमटे घेतल्यावांचून आम्ही जागे होणार नाहींच कीं काय, म्हणून त्यांनीं उपरोधाचा अत्यंत उपयोग केला आहे. ज्याला तो समजेल त्याच्या थेट उरांत तो घुसल्याशिवाय राहणार नाहीं, इतका तो तीक्ष्ण आणि बिनचूक आहे. मात्र ज्यांच्या मेंदूला धक्का पोचूनही हें व्याजोक्त उपरोधाचें आवरण फुटणार नाहीं, ती मंडळी, "आम्हांला काय त्याचें ?" म्हणतील कीं काय अशी भीति वाटते.

औंध,
११-१२-३५

**भवानराव पंडित,**
प्रातिनिधि, सं. औंध

## गीता-वेदान्त-वाचस्पति सदाशिवशास्त्री भिडे यांचा 'स्फूर्तिलहरी'वरील आशीर्वाद

श्रीयुत काव्यविहारी यांचा नवीन काव्यसंग्रह 'स्फूर्तिलहरी' अनेक दृष्टींनीं अभिनंदनीय आहे. तो वाचतांना खरोखर हवें होतें तेंच मिळालें असें वाटून, वाचकांना समाधानाचा सुस्कारा सोडावा असें वाटल्यावांचून राहणार नाहीं. अगदीं थोडे अपवाद वगळले तर गेल्या १०।१२ वर्षांत निर्माण झालेल्या मराठी कादंबऱ्या, लघुकथा, स्फुट व दीर्घ काव्यें यांत एक उन्मादक असा शृंगाराचा दर्प भरलेला आढळतो. अशा प्रणयप्रधान पुस्तकांहून स्फूर्तिलहरींचें स्वरूप भिन्न आहे. काव्याविहारींची कविता ओजस्वी, हेतुप्रधान व भावनापूर्ण आहे. हें स्फूर्तिलहरींतील 'मान्यांच्या मुलास', 'जगाचा न्याय', 'खार आणि घार', 'आज आणि उद्यां' या कवितांवरून दिसून येईल. अशा मर्दानी व ओजस्वी कविता लिहिणारे 'काव्यविहारी' सौंदर्यचित्रणही तितक्या हलुवार हातानें करूं शकतात हें त्यांच्या 'माधुरी', 'रांगोळी', 'मोटेवरचें गाणें' या कवितांवरून दिसून येईल. मात्र सौंदर्यवर्णन करतांना कवीनें पावित्र्याची बैठक केव्हांही सोडलेली नाहीं याबद्दल कवीची करावी तेवढी प्रशंसा थोडीच आहे. काव्यविहारी यांच्या कांहीं कवितांत गीता व उपनिषदें यांतील तत्त्वें आढळतात. गीतेंत ज्याप्रमाणें वेदांताचा उपदेश कर्तव्याच्या तीक्ष्ण धारेवर उभा राहून केला आहे, त्याप्रमाणें स्फूर्तिलहरींतील तत्त्व-प्रतिपादन पुरुषार्थाच्या धारेवर उभें राहून कवीनें केलें आहे. अन्यायाची चीड, सौंदर्याचें पवित्र कौतुक, आळस व दौर्बल्य इत्यादिकांचा कठोर उपहास व स्वातंत्र्यप्रीति इत्यादि भावनांनीं हेलावणाऱ्या 'स्फूर्तिलहरी' "उत्तिष्ठत ! जाग्रत !" हा कठोपनिषदाचा ओजस्वी संदेशच समाजाला ऐकवीत आहेत असें वाटतें. हें प्रकाशन यशस्वी होवो असें इच्छितों.

गीताधर्ममंडळ, पुणें
२०।१२।३५

सदाशिवशास्त्री भिडे

# अंतरपाट

'स्फूर्तिलहरी' हें काव्यविहारींचें दुसरें अपत्य. पहिल्या अपत्याच्या वेळीं जशी माहेराच्या बोलावण्याची तशी पहिल्या पुस्तकाच्या वेळीं प्रोत्साहक प्रस्तावनेची अपेक्षा असणें कांहीं फारसें गैर नाहीं. पण पहिलेपणाची नवाई ओसरून गेल्यानंतरही एखादी माता माहेरावर हक्क सांगूं लागली तर तें बरें दिसेल का? ( गांधारीला ही लहर आली असती तर तिच्या माहेराची काय स्थिति झाली असती? ) यामुळें काव्यविहारींनीं मला या काव्यसंग्रहाला प्रस्तावना लिहायला सांगितली तेव्हां मी क्षणभर बुचकळ्यांतच पडलों. कवि या नात्यानें उणेंपुरें दीड तप ते महाराष्ट्र-रसिकांपुढें आहेत. त्यांतून वाङ्मयविश्व हें एका दृष्टीनें गंधर्वलोकाहूनही अद्भुतरम्य! धर्म कितीही उदार झाला तरी पतिपत्नींचें सख्य निर्माण करायला त्याला सात पावलांची मर्यादा घालावीच लागते. पण काव्यसृष्टींत एका चरणानें सुद्धां रसिकांची व कवींची जन्माची मैत्री जुळलेली आढळून येईल. 'आहे मनोहर तरी गमतें उदास', 'रचिसि वेषभषा। अथवा कुसुमचाप-पाशा?', 'आनंदी आनंद गडे! इकडे तिकडे चोहिंकडे', 'झोंक तोल तोल तोल ग! आडाचं पाणि लई खोल ग' या सहज आठवलेल्या ओळीच पहाना! कधीं तरी वाचलेल्या किंवा ऐकलेल्या! पण लाख ऊन होतांच तिच्यावर सुंदर अक्षरांचा ठसा जसा कायमचा उमटतो,

त्याप्रमाणें सौंदर्योत्सुक मनांत हे रम्य चरण सहज जाऊन बसतात. एका चरणाचें एवढें माहात्म्य शिळेंतून विश्वसुंदर अहिल्या निर्माण करणाऱ्या रामचंद्रासारख्या देवाशिवाय दुसऱ्या ठिकाणीं आढळणें शक्य नाहीं. रामदासासारख्या व्यवहारी संतानें सुद्धां कवींना ‘ शब्दसृष्टीचे ईश्वर ’ ही पदवी बहाल केली त्याचें कारण दुसरें काय असणार ?

पण ईश्वर आणि त्याचे भक्त यांच्यामध्यें पाद्यपूजा घेणाऱ्या शंकराचार्यांपासून नारळावर संतुष्ट होणाऱ्या गुरवापर्यंत हजारों तऱ्हांचे दलाल असतातच कीं ! कवि व रसिक यांच्यामध्यें प्रस्तावनाकार असलाच पाहिजे, असा जो हल्लीं संकेत पडून गेला आहे तोही असाच वाटतो. शिवाय हा संकेत पडला कवींचा ! सभेला येणारे वक्ते अगर देणग्यांचीं अभिवचनें देणारे दाते यांचे संकेत निराळे ! कवींचे संकेत म्हणजे त्यांच्या काव्यांत आढळणारे रमणीसंकेतच ! ते तिळभर चुकायचे नाहींत अगर पळभर मागेंपुढें व्हायचे नाहींत. भारद्वाज गोत्रांतील आजचा भावकवि आपल्या पूज्य पूर्वजाच्या वल्कलाऐवजीं पायजमा पेहेरायला मुळींच चुकणार नाहीं. पण घरांत त्रास देणाऱ्या भुंग्याला केरसुणीनें झोडपण्याचा त्याला सराव असला तरी छंदांत प्रियेला आळवतांना ‘ कमलिनी सखे तूं अन् मी प्रेमळ भृंग ’ असेंच तो गाईल. केवळ या संकेत-प्रियतेमुळेंच काव्यविहारींनीं मला प्रस्तावना लिहायला सांगितली असेल असें नाहीं; पण सतरा अठरा वर्षांत रसिकांना लहान मोठया सुमारें शंभर कविता सादर करणाऱ्या कवीला प्रस्तावक हवा कशाला ? प्रेमविवाह ठरल्यानंतर मुलगी ‘ पाहण्याचें ’ नाटक करण्यापैकींच हा प्रकार नाहीं का ?

परंतु पहिल्या पुस्तकाच्या वेळीं चुकलेला माहेरपणाचा हक्क बजावून घेण्याकरितां काव्यविहारींनीं मला प्रस्तावनेविषयीं विनंति केली असण्याचा संभव आहे. त्यांचें हें दुसरें अपत्य असलें तरी पाळणा तब्बल तपाचा

असल्यामुळें ( काव्यविहारजन्म – १९२३ ) या नव्या बाळाचें कौतुक त्यांनीं पहिलेपणाच्या प्रेमानें करावें हें स्वाभाविकच आहे, त्यामुळें माझी भूमिका एखाद्या स्नेह्याच्या मुलाच्या बारशाला जाणाऱ्या मित्राच्याहून कांहीं फारशी भिन्न नाहीं. आतां मित्र म्हटला म्हणजे तो तान्ह्या बाळाचें जेवढें कौतुक करील तेवढीच त्याच्या नकट्या नाकाची चेष्टाही करील; पण कांहीं झालें तरी कान टोंचण्यासारख्या ज्या गोष्टी आहेत त्या तज्ज्ञ सोनाराकरि-तांच शिल्लक राहतील.

काव्यविहारी व मी दोघेही सांगलीच्या पंचक्रोशींत लहानाचे मोठे ( फार मोठे नाहीं हं ) झालों. भाषेप्रमाणें मैत्रीही बारा कोसांवर बदलते कीं काय कुणाला ठाऊक ! पण आम्हां दोघांत लहानपणीं जसें वयाचें तसें स्थला-चेंही मोठेंसें अंतर नव्हतें. त्यांनीं माझ्यापेक्षां चार दोन पावसाळे जास्त पाहिले असले तरी गेलीं अठरा वर्षें मीं कोंकणांत घालविलीं असल्यामुळें पाऊस त्यांच्यापेक्षां मींच अधिक पाहिला आहे. एकाच वेळीं आम्ही सांगली-हायस्कूलांत विद्यार्थी होतों. पुढें लवकरच काव्यविहारींच्या कविता ‘मनो-रंजना’सारख्या प्रमुख मासिकांतून प्रसिद्ध होऊं लागल्या. क्रीडा, कला व कांता अगर कांत या व्यक्तीच्या पूर्ववयांतील तीन कालखंडांच्या अधि-ष्ठात्री देवता म्हणतां येतील. या तीन पायऱ्यांपैकीं पहिलीवरून दुसरीवर कसें चढावें या विचारांत मी असल्यामुळें ( साभार परत आलेल्या कवितां-मुळें नव्हे ) ‘मनोरंजना’सारख्या लोकप्रिय मासिकांत काव्यविहारींच्या कविता छापून येत असलेल्या पाहून मला माझ्या या शालाबंधूविषयीं एक प्रका-रचा आदर उत्पन्न व्हावा यांत कांहीं नवल नव्हतें. एक गोष्ट – बहुधा १९१७ तली – मला अजूनही आठवते. ‘मनोरंजना’च्या पहिल्याच पानावर ‘ सांत्वन ’ ही त्यांची कविता नुकतीच छापून आली होती. सांगलीच्या कापडआळींतील रस्त्यावर काव्यविहारी मला दिसले. माझ्याबरोबरचा मित्र

त्यांच्याशीं कांहीं बोललाही; पण मी मात्र त्यांच्याकडे नुसता आश्चर्यवत् पाहत होतों. कविता करायची—ती छापून यायची—आणि तीही 'मनोरंजना'च्या पहिल्या पानावर ! केवढें आश्चर्य ! स्वर्गसुख कांहीं यापेक्षां निराळें नाहीं, असेंच त्या वेळीं मला वाटलें असावें. तेव्हां 'मनोरंजना'चें पान म्हणजे होतकरू कवींना शारदेच्या दरबारांतील पहिली खुर्चीच वाटे. या काळा-नंतरचें काव्यविहारींचें आयुष्य जन्मभूमीच्या आसपासच गेलें. पण जन्म-भूमि स्वर्गासारखी असली तरी कर्मभूमि पाताळासारखी असते, हा अनु-भव घेण्याकरितांच कीं काय मी कोंकणांत आलों. वियोगानें प्रेम वाढतें या न्यायानें असो अगर अन्य कारणानें असो, शाळेच्या चिमुकल्या जगांतील आमचें स्नेह-बंधन दृढतरच होत गेलें व तेंच आज माझ्या गद्याची आणि त्यांच्या पद्याची निरगांठ मारून ठेवीत आहे.

नवमतवादी विभावरीबाईची क्षमा मागून टोपणनांव म्हणजे बुरखा असें म्हणायला कांहींच हरकत नाहीं. मराठी कवींमध्यें ही पडद्याची प्रवृत्ति उत्पन्न होण्याचें कारण आधुनिक कवितेविषयींची वाचकवर्गाची उदासीन वृत्ति असण्याचा संभव आहे. बुरख्यामुळें ज्याप्रमाणें प्रसंगीं कुरूपपणावर पांघरूण पडतें त्याप्रमाणें टोपणनांवाचाही अब्रू बचावण्याच्या कामीं कित्येकांना उपयोग होत असेल, नाहीं असें नाहीं; पण केशव-सुतांपासून सुरू झालेल्या टोपणनांवांच्या हौसेचें 'जननीजनकज'-सारख्या नांवांनीं विडंबन झालें, तरी अजून तिची मोहिनी नाहींशी झाली नाहीं ! "काव्यं यशसे" असें मम्मट म्हणतो. तेव्हां नांव मिळविण्याचें काम आरंभींच पार पाडावें असाही यांत कांहीं कवींचा हेतु असेल ! नाहीं कुणीं म्हणावें ? 'काव्यविहारी' हें टोपणनांव एका दृष्टीनें कवीच्या मनोवृत्तीचें द्योतक आहे. केशवसुतांच्या पिढींत पितृभक्ति अधिक असल्यामुळेंच कीं काय टोपणनांवांचा आईबापांशीं अधिक संबंध येई.

गडकऱ्यांच्या पिढीला पितृभक्तीची जागा बंधुप्रेमानें घेतली. याचा अर्थ या काळांतील कवींत पत्नीप्रेम नव्हतें असा मात्र नाहीं. अमुक-कांत, तमुक-रमण, वगैरे कवींचीं नांवें जुन्या मासिकांचे अंक चाळतांना सहज दृष्टीला पडतील. स्वतंत्र, विविध व प्रसंगीं विक्षिप्त टोपणनांवांचा काळ त्यानंतर आला. 'गिरीश,' 'वनमाली,' 'अरविंद,' 'माधव ज्यूलियन्' 'आनंद' हीं रसिकांना पूर्णपणें परिचित असलेलीं नांवें याच काळांत प्रथम चमकूं लागलीं. काव्यविहारीही कालदृष्ट्या याच रांगेंतले. चिपळूणचे आनंद एका बाजूला पडल्यामुळें त्यांच्या कवितेंत जसें वैशिष्ट्य आढळतें, तसें तें काव्यविहारींच्या कवितेंतही दिसतें.

काव्यविहारींची पहिल्या पुस्तकांतील अगदीं पहिली कविता 'शारदा-स्तवन' ही १९१५ च्या आरंभीं लिहिली गेली. सोंगट्या खेळतांना पहिला डाव जसा गजाननाचा, त्याप्रमाणें काव्य करतांना पहिला मान शारदेचा असें अद्यापिही कवींना वाटतें, हें कुठलाही काव्यसंग्रह चाळला असतां लक्षांत येईल. राम, कृष्ण, विठोबा, वेतोबा वगैरे देवतांवर आधुनिक कवींची बेताबाताचीच श्रद्धा असते; पण शारदेला आळवण्यांत मात्र ते तिळमात्रही कसूर करीत नाहींत. एका अर्थानें तें योग्यच नाहीं का ? तिकीट नसलेल्या मनुष्याला वशिल्याशिवाय नाटकगृहांत कोण सोडणार ? नवख्या कवीची परिस्थिति थोडीफार अशीच असते ! 'शारदा-स्तवना' नंतरच्या त्या संग्रहांतील कविता 'फुलें' व 'चंद्र' यांविषयीं आहेत. त्यांतील फुलाची विनंति वनवासी फुलाच्या कैफियतीसारखीच आहे. 'चंद्रोदय' या कवितेंतील

'गगनसागरवीचिगत हा फेन पसरे नभिं अहा'
'अमररमणीपादतलहत म्हणुनि विहरे गगनिं हा'

अशासारख्या ओळी वाचून या वेळीं कवि इंटरमीजिएटच्या वर्गांत

कादंबरीचें अध्ययन करीत असावेत असा कयास कुणीही बांधील. 'चांदोबा चांदोबा भागलास का ? निंबोणीच्या झाडामागं लपलास का,' ह्या काव्याची सद्दी फक्त बिगारींतच असते. त्यामुळें कॉलेजांतील काव्यविहारी चंद्राची

" प्रणयठेवा गेहिंचा सोडुनीयां
वृथा जासी परचुंबनीं रमाया "

अशी निर्भत्सना करतात यांत नवल तें कसलें ?

१९१६–१८ या तीन वर्षांतील त्यांच्या काव्यांत किंत्याबरहुकूम काढलेल्या पुस्त्यांखेरीज एक विशेष निःसंशय दिसतो. तो म्हणजे समाजांतील रंजलेगांजलेल्यांविषयीं त्यांना वाटणारा कळवळा. ' कृष्णाकांठी ' या कवितेंत समाजाच्या छळाला कंटाळून आत्महत्या करणाऱ्या हिंदु विधवेची करुण मूर्ति दिसते, तर ' शुभमंगल सावधान ! ' मध्यें म्हाताऱ्याच्या गळ्यांत माळ घालावी लागणारी आर्य अभागिनी दृष्टीला पडते ! 'परीक्षेचा बळी' म्हणजे नापास झालेल्या विद्यार्थ्याची आत्महत्या ! 'ध्यास', ' युरोपियन मुलास पाहून', ' चिमुकला संसार ' या त्यांच्या याच वेळच्या कविता सरस वठल्या आहेत.

१९१८ अखेर ' कै. केशवसुतांस ' व ' केशवसुतांची कविता वाचून ' या दोन कविता काव्यविहारींनीं लिहिल्या. १९१७ सालीं प्रसिद्ध झालेल्या केशवसुतांच्या काव्यसंग्रहाच्या अभ्यासानें " किती तुतारीभक्त जाहले त्यांतिल हा मी एक " अशी भावना त्यांच्यामध्यें निर्माण केली. सामाजिक अन्यायांविषयीं आधींच जागरूक असणाऱ्या त्यांच्या कविमनावर केशवसुतांच्या कवितेचा सतरा वर्षांपूर्वी परिणाम व्हावा हें स्वाभाविकच होतें. सुधारणेच्या विचारांची भरती केशवसुतांच्या पलीकडे त्या वेळीं गेलीच नव्हती. परावर्तकामुळें दिव्याचा प्रकाश अधिक प्रखर व्हावा, त्याप्रमाणें केशवसुतांच्या आवेशपूर्ण कल्पनेनें नटलेलीं तुतारींतील

कडवीं काव्यविहारींच्या तरुण मनाला गद्य विचारांपेक्षां स्फूर्तिदायक वाटलीं यांत आश्चर्य नाहीं. भौतिकतावादाचें शिफारसपत्र घेऊन आलेली ‘ काणे-करां ’ सारख्या अगदीं अलीकडील कवीचीं ‘ कवनें ’ ही कविता पाहिली तरी ‘ तुतारी ’चे प्रतिध्वनि अजूनही मराठी कवितेंत ऐकूं येत आहेत असेंच म्हणावें लागेल; आणि असें घडावें, यांत अस्वाभाविक असें काय आहे ! केशवसुतांइतकें युगमाहात्म्य दुसऱ्या कुणाच कवीला जाणवलें नाहीं. कविताकामिनीला शृंगार चढविण्यांत दंग झालेल्या पंडित कवींना किंवा ब्रह्मानंदीं टाळी लागल्यामुळें देहभान विसरलेल्या संतकवींना जे विषय त्याज्य अगर नीरस वाटले त्यांतील दिव्यपणा केशवसुतांनींच प्रभावशाली रीतीनें प्रथम प्रकटविला. संस्कृतप्राचुर्यामुळें मराठीचा होणारा कोंडमारा, तेच तेच शुष्क शब्दालंकार व अर्थालंकार, पिढीजाद वृत्तांच्या चाकोऱ्यांतून काव्यशकट हांकण्याची हौस, या सर्वांचा कंटाळा येऊन केशवसुतांनीं वर्डस्वर्थप्रमाणें बंडाचा झेंडा उभारला व तो विजयी केला. सांसारिक दुःखांनीं पृथ्वीला खिळवून टाकलें असतांना वातचक्रावर तरंगणाऱ्या, दीनदशेचीं भुतें थैमान घालीत असतां तुतारी फुंकणाऱ्या, पोट पाठीमागें लागलें असतांना हृदय नैर्ऋत्येकडल्या वाऱ्याबरोबर नाचविणाऱ्या या कवीच्या प्रतिभेची उज्ज्वलता कोण नाकारणार ! ‘ तुतारी ’, ‘ गोफण ’, ‘ स्फूर्ति ’ या त्यांच्या कवितांचें वर्णन “Many of his poems are trumpet-calls that every man, who would not remain dungeoned in conventions and bound by outward formulas should follow him on the open road of self-reliance that leads to the city of freedom.” या व्हिटमिनविषयीं काढलेल्या उद्गारांनींच करावें लागेल.

एखाद्या तरुण लेखकानें मागील पिढींतील श्रेष्ठ लेखकाला गुरु मानणें

म्हणजे वाङ्मयांत बुवाबाजी माजविणें होय, अशी मानभावीपणाची हांकाटी हल्लीं ऐकूं येत आहे. ‘ लांडगा आला रे आला ’ म्हणून उगाच ओरडणाऱ्या इसापनीतींतील मुलाचा अनुभव या हांकाटी करणारांना न येवो म्हणजे झालें ! कस्तुरीमृगाप्रमाणें त्यांच्या पोटांतही एखादें गुरुपीठ असायचें ! त्यांच्या मतें केशवसुत, कोल्हटकर, गडकरी इत्यादिकांचा गुरु म्हणून उल्लेख करणें गैरशिस्त ! पण ज्याच्या कादंबऱ्यांचा अद्यापि आपल्याकडे फारसा प्रचार झाला नाहीं त्या रोमाँ रोलाँची स्थानीं अस्थानीं जपमाळ घेणें मात्र अत्यंत आवश्यक ! काव्यविहारींनीं केशवसुतांना दिलेलें गुरुत्व, वाङ्मयक्षेत्रांत ‘उपासनीबुवा’ आहेत अशा समजुतीनें ‘दिवेकरशास्त्री’ होऊं पाहणाऱ्या लोकांना, वस्तुस्थितीची कल्पना आणून देईल तर फार बरें होईल. काव्यविहारींनीं केशवसुतांना गुरुपद दिलें त्या वेळीं गुरु स्वर्गस्थ झाले होते हें शिष्याचें भाग्यच म्हणायचें ! नाहीं तर त्यांच्या वशिल्यानें कविता छापून याव्यात म्हणूनच हा गंडा त्यांनीं बांधून घेतला असें म्हणायलाही हे समंजस संशोधक चुकायचे नाहींत ! बिचाऱ्या दत्तानें प्राचीन काळीं चोवीस गुरु केले म्हणून तो बचावला ! १९३५ सालीं हें धाडस जर त्यानें केलें असतें तर प्रत्येक अंकांत त्याच्या एकेका गुरूची मुक्तछंद संभावना करण्याची संधि मिळाल्यामुळें एखाद्या पाक्षिकाला वर्षभर मजकुराचा पुरवठा तरी झाला असता ! गडकऱ्यांचा उल्लेख अत्रे ज्या सद्गदित वृत्तीनें करतात, तिची गणना जर एखादा अकांडपंडित गुरुबाजींत करूं लागला तर दूध आणि दारू यांतील अंतर ओळखण्याचें ज्ञान कोणत्या तरी उपायानें त्याला प्राप्त करून देणें जरूर आहे असेंच कुणीही म्हणेल. मोपाँसासारख्या जगद्विख्यात कथालेखकाच्या लेखनाला फ्लॉबर्टनें लावलेलें वळण या आक्षेपकांना माहीत नाहीं असें तरी कसें म्हणावें ? कारण जागतिक वाङ्मय हा तर शारदामन्दिरांतील त्यांचा परवल !

काव्यविहारी अजूनही स्वतःला केशवसुत-सांप्रदायाचे म्हणवितात. १९१८ साली केशवसुतांचा शिष्य होऊन गडकऱ्यांचा गुरुबंधु म्हणून मिरविण्याची शक्यता तरी एखाद्याला होती; पण केशवसुतांच्याच नव्हे तर गडकऱ्यांच्या लोकप्रियतेला आलेली भरती पूर्णपणें ओसरली असतांना अजूनही त्यांना आपल्या सांप्रदायिकत्वाचा अभिमान वाटतो. हा अभिमान कांहीं निव्वळ आंधळा नाहीं. त्यांचा अभिमान प्रसंगीं गांधारीप्रमाणें डोळे बांधून घेत असेल! पण तो जन्मजात धृतराष्ट्र नव्हे! लोकप्रियतेच्या वायुलहरीबरोबर मराठी कवितेची पवनचक्की घडोघडीं नाचत असतांना काव्यविहारी आपल्या ब्रीदापासून रेसमात्रही ढळले नाहींत, ही गोष्ट त्यांच्या प्रामाणिक गुरुभक्तीची साक्षच नव्हे काय? केशवसुतांच्या कवितेचा संस्कार मनावर होईपर्यंत काव्यविहारींची स्फूर्तिनौका वाङ्मयसागरावर तरंगत होती. लहरी नाचवितील तसें तिला नाचणें भाग होतें. अंतःकरणांतील मूक भावनांना बोलक्या करणारा जादूगारच तिला मिळाला नव्हता. ध्रुवतारा दिसल्याशिवाय कोणत्या नौकेला वादळांत आत्मविश्वासानें प्रवास करतां येतो? 'काव्यविहार' सहज उघडून पाहावा. केशवसुतांना उद्देशून ज्या दोन आदरदर्शक कविता काव्यविहारींनीं लिहिल्या, त्यांच्या पाठोपाठ त्या वेळीं लोकप्रिय झालेले त्यांचे सवाल लिहिले गेले. हे सवाल आज अनेक स्थळीं अगदीं गद्यवजा वाटतात. पण त्या वेळीं त्यांनींच या उदयोन्मुख कवीकडे लोकांची दृष्टि वळविली. जणुं कांहीं हा सुधारणावादी कवि सवालांच्या रूपानें जीर्ण रूढींचा लिलांवच पुकारीत होता. केशवसुतांना गुरु मानल्यामुळें काव्यविहारींचा तोटा झाला असेंही म्हणतां येणार नाहीं. समुद्राला मिळणाऱ्या खाडीचें पाणी समुद्राच्या भरतीनें जसें वाढतें, त्याप्रमाणें त्यांच्या विशिष्ट मनोरचनेची बैठक केशवसुतांच्या कवितेच्या अभ्यासानें थोडी तरी रुंद झाली. सवाल सोडून दिले तरी बॅकबेच्या वाळवंटांत बसून

उसळ सागरा ! उसळ असा
खेळ सागरा ! खेळ असा
स्वतंत्रतेच्या अंकावरती लोळत राहीं स्वैर असा ॥ ध्रु० ॥
थांब सागरा थांब जरा
हृदयीं मजला दे थारा
लाटांवरि तव घेउनि मजला खेळवीत ने वरवरती.

अशी समुद्राला विनंति करणारा कवि,

‘ मीहि कशाला येथ रहावें ?
काय असें ज्या मीं चिकटावें ?
वाटे गिरक्या घेत मिळावें
या पवनाच्या चक्रीं, होउनि लीन सच्चिदानंदांत. ’

हे उद्गार काढणाऱ्या कवीच्याच सांप्रदायांतला वाटत नाहीं का ? १९२१-२२ मधील काव्यविहारींच्या कवितांपैकीं ‘हृदयेश्वरीस’, ‘आकाश-दिवा पाहून ’, ’ पूर्व-पश्चिम ’, ‘ एक मागणें ’ या कविता वाचनीय असून केशवसुतांच्या सांप्रदायाशीं ते किती लवकर समरस झाले होते हें दर्शविणाऱ्या आहेत.

‘काव्यविहारा’ नंतरच्या बारा वर्षांत लिहिलेली कविता ‘स्फूर्तिलहरीं’त समाविष्ट होत आहे. केवळ कवितांच्या संख्येकडे पाहिलें तर कवीच्या लेखनाचा वेग मंदावलेला दिसतो. वर्षाला अवघ्या चार कविता ! आमचे कॉलेज-कवि म्हणतील ‘ बसल्या बैठकीला आम्ही इतक्या कविता लिहून दाखवितों. ’ कविता लिहिण्याचें रेकॉर्ड मोडण्याची लाट आली तर ‘विक्रम-सिंग ’ होण्याचा मान कॉलेज-विद्यार्थ्याला—व त्यांतूनही ज्यूनिअर बी.ए. मध्यें असलेल्या मराठीच्या विद्यार्थ्याला— मिळणेंच स्वाभाविक आहे. काव्याचें अनेक दृष्टींनीं वयाशीं व्यस्त प्रमाण आहे यांत शंका नाहीं.

पांचव्या वर्षी जो चिमुकला आत्मा गंधर्वनगरींतल्या गोष्टी ऐकून डुलत असतो, त्याला पांचावर पांच चढले कीं पेनशनीखेरीज दुसरी भाषाच रुचत नाहीं ! शिवाय प्रौढपणीं काव्यनिर्मिति कमी होण्याचीं कितीतरी कारणें आहेत. विशीच्या आंतलें काव्य म्हणजे झाडाची बाह्य वाढ ! पण माड झाला म्हणून कांहीं तो वर्षानुवर्षें उंचच होत नाहीं. कोणत्याही झाडाचें महत्त्व जसें त्याच्या आकारावर नसून फळांच्या रसाळपणावर असतें, त्याप्रमाणें काव्याचें अंतिम महत्त्वही केवळ त्याच्या अंतरंगावरच अवलंबून असतें.

देवलांच्या हरिपूरांत काव्यविहारींचा जन्म १८९४ सालीं झाला. सांगली हायस्कूलमधील दुय्यम शिक्षण हरिपूर ते सांगली दररोज चालत येऊन जाऊन त्यांनीं संपादन केलें. अर्थात् पुण्या-मुंबईकडील कवि म्हणजे कॉडलिव्हरऑईलवर जगणारा दुबळा प्राणी अशी समजूत असणाऱ्या मध्यप्रांतीय कविमल्लांना हें ऐकून आश्चर्य वाटेल ! काव्यविहारींचें कॉलेजच्या पहिल्या दोन वर्षांचें शिक्षण कोल्हापूरच्या राजाराम कॉलेजांत होऊन ते बी. ए. करितां १९१५ सालीं फर्ग्युसन कॉलेजांत दाखल झाले. जन्माला येऊन कॉलेजांत जायचेंच असेल तर तें अशा वेळीं जावें असें अजूनही वाटतें. लो. टिळक नुक्तेच मंडालेहून सुटून आले होते. गडकऱ्यांचा कीर्तिसूर्य क्षणोक्षणीं उज्ज्वल होत होता. बालकवींचें दर्शनही पुण्यांत घडणें त्या वेळीं दुर्भिळ नव्हतें. मनोरंजनांतून रागिणीचा मंजुळ व उत्तरेचा तडफदार आवाज तर दर महिन्याला घरोघर ऐकूं येत होता. क्रिकेटपासून नाट्यापर्यंत सर्व क्षेत्रें त्या वेळीं पराक्रमपूर्ण दिसत. कॉलेजांत नुसती हजिरी देऊन पळ काढण्याच्या इच्छेनें आलेला विद्यार्थीही अध्यापकाच्या कौशल्यानें मंत्रमुग्ध होऊन आपला पलायनाचा बेत रद्द करीत असे. रँग्लर परांजपे, वासुदेवराव पटवर्धन, हरिभाऊ-

लिमये, डॉक्टर गुणे — त्या वेळच्या सर्व चांगल्या अध्यापकांचीं नांवें यायचीं म्हणजे एक कारिकाच रचली पाहिजे. विद्यार्थ्यांच्या बुद्धिविकासाला सर्वस्वीं पोषक अशा या वातावरणांत काव्यविहारींच्या प्रारंभींच्या कविता लिहिल्या गेल्या. १९१७ ते १९१९ हीं दोन वर्षें एल्‌एल्. बी. च्या अभ्यासांत त्यांनीं मुंबईला घालविलीं. १९१९ पासून आठ वर्षें मामलेदार व आतां सबजज्ज म्हणून ते बुधगांव संस्थानांत काम करीत आहेत. मध्यंतरीं तीन वर्षें विलिंग्डन कॉलेजांत मराठीचे अध्यापक म्हणून त्यांनीं निर्वेतन काम केलें होतें; नाहीं असें नाहीं. पण गेल्या सोळा वर्षांत त्यांचा सरस्वती-मंदिराशीं संबंध एकंदरीनें कमीच आला; न्यायमंदिरांतच त्यांनीं जगाचे कडू-गोड घुटके घेतले असें म्हणायला हरकत नाहीं.

न्यायदेवता आंधळी असते अशी म्हण आहे. पण मला वाटतें, जगानें आपल्यापुढें स्वच्छंदानें वागावें म्हणून ती आंधळ्याचें सोंग घेते. तिची दृष्टि क्ष किरणांहूनही भेदक असते. या संग्रहांतील 'स्फुट अभंग', 'जगाचा न्याय', 'दोन चित्रें' इत्यादि कविता पहाव्यात.

" मार्गावरि ठायीं ठायीं
हिंडतात गोगलगाई
जग तुडवी त्यांना पायीं
परि नाग विषारी फणा काढुनी डौलानें जायाचा. "

हे कवीचे उद्गार काल्पनिक आहेत असें कोण म्हणेल ! कवीच्या मनाची तळमळ 'जगाचा न्याय' या कवितेंतील प्रत्येक कडव्यांत स्पष्टपणें प्रतीत होते.

" भिजुनियां चिंब घामानें
खपुनि जे पिकविती रानें
ते मरती करभारानें
अत्तरी दिवे जाळितो छोकरा ऐदी श्रीमंताचा ! "

हें कटु सत्य तर व्यवहारांत पदोपदीं अनुभवाला येतें. ' दोन चित्रें ' मधील उपरोध मोठा खोंचदार आहे. बाळपण रम्य कां याचा उलगडा असे अनुभव पाहिल्यानंतरच होत नाहीं का ?

केशवसुतांच्या सांप्रदायिक खुणा या संग्रहांत विपुलतेनें आढळतात. मात्र या खुणा म्हणजे अंध अनुकरण अगर निर्जीव प्रतिबिंब नव्हे. समुद्राच्या लाटांची विविध वक्रता वायुलहरींवरून येऊन तीराजवळील वाळवंटांत नाजुक रीतीनें उमटते. दोहा वृत्ताच्या सरांस उपयोगापासून सामाजिक अन्यायांविरुद्ध उपसलेल्या हत्यारांपर्यंत ' स्फूर्तिलहरी 'तील अनेक गोष्टी केशवसुतांची आठवण करून देतात. ' स्फूर्तिदेवते ' या कवितेंतील चवथ्या कडव्याचा आरंभ असा आहे.

अन्यायें देतांच कुणी थप्पड एका गालीं
" गाल दुजा द्यायास पुढें ज्यांची नित्य तयारी "

ह्या ओळी वाचून " वैर तयांला थप्पड बसतां चोळिति जे गालांस " या केशवसुतांच्या गोफणींतील एका अणकुचीदार धोंड्याची कुणालाही आठवण होईल. असलें तुरळक कल्पनासाम्य कविमनाची आवड स्पष्टपणें दर्शवितें. परंतु काव्यविहारींचा कल केशवसुतांच्या काव्याकडे झुकत असला तरी दीड तपापूर्वीं केशवसुतांविषयीं जी रसिकांची कल्पना होती ती आज तशीच कुठें राहिली आहे ? त्या वेळीं वडिलांचें नांव केशव असणें हें होतकरू कवीला मोठ्या भाग्याचें लक्षण वाटे. इंग्लिश इतिहासांतील एडवर्ड-हेन्रीप्रमाणें केशवसुतांची संख्या वाढावी अशीच त्या वेळची काव्यप्रांतांतली हवा होती. पण पुढें केशवसुत नं. ३ व नं. ४ होण्याची सहज आलेली संधि गिरीश ( शंकर केशव कानेटकर ) व केशवकुमार (प्रल्हाद केशव अत्रे) यांनीं गमावली हें केशवसुतांच्या लोकप्रियतेला ओहोटी लागल्याचेंच लक्षण होतें कीं काय कुणाला ठाऊक ! तांब्यां-

-ची १९२० नंतरची कविता व रविकिरणमंडळाचें कर्तृत्व ( अर्थात् शूर्पणखा-सारखी वृत्तांना दिलेलीं राक्षसी नांवें सोडून ) यांनीं गेल्या तपांतील मराठी कवितेला निराळें वळण लाविलें. 'काव्यविहारी' बुधगांवसारख्या एका आडगांवीं नसते तर त्यांची कविताही या नवीन लाटांवर आरोहण करून अधिक शोभिवंत दिसली असती असा विचार मनांत येत नाहीं असें नाहीं. पण विषय तर दूरच राहोत, वृत्तांच्या बाबतींत सुद्धां त्यांनीं गेल्या दशकांतील स्थित्यंतराकडे तटस्थ दृष्टीनेंच पाहिलें आहे. समुद्रांत वादळ होवो वा सूर्यास्ताची सुंदर शोभा दृष्टीला पडो, गांवांतल्या देवळापुढील पुष्करिणी आपल्या कमळांच्या डोलांतच गुंग असते. परिस्थितीनें त्यांची प्रतिभाहि अशीच झाली आहे. परंतु त्याबरोबर हेंही कबूल केलें पाहिजे कीं, लोकप्रियतेच्या नादीं लागून त्यांनीं कधींही स्वत्व सोडलें नाहीं. अन्यांच्या झेंडूच्या फुलांना त्यांच्या कल्पकतेमुळें अवीट रंग चढला. पण या नैसर्गिक झेंडूच्या फुलांचा बाजारभाव पाहतांच भडक रंगीत कागद व बोथट कात्र्या घेऊन झेंडूचीं कागदी फुलें तयार करण्याचे अनेक कारखाने महाराष्ट्रांत सुरू झाले. गंभीर काव्यांत माणुसकी असावी लागते म्हणूनच कीं काय विडंबनकाव्यांत मर्कटचेष्टांना ऊत आला. विनोद हवेसारखा हलकाच असायचा हें खरें. पण हवेप्रमाणें तो शुद्ध असतो तेव्हांच त्याची किंमत ! एखाद्या प्रसिद्ध कवितेच्या दोन चरणांवर वेडीवांकडी शस्त्रक्रिया करून प्रौढ मुलांमुलींविषयीं चटोरपणानें लिहिणें अगर मिशा काढल्यामुळें चुंबनाला अडथळा येत नाहीं असल्या चावट कल्पना वृत्तबद्ध करणें म्हणजे कांहीं विनोदी कविता अगर व्यंगकाव्य लिहिणें नव्हे. पंडित सप्रे यांच्यासारखे काव्यांत कुशलतेनें उपरोध व्यक्त करणारे कांहीं उदयोन्मुख कवि सोडले तर मराठींतील आजच्या विडंबनपर कवितेंत टीकेचें वैशिष्ट्य अगर कल्पकतेची चमक बिलकूल आढळत नाहीं. नियतकालिकांत दर आठवड्याला प्रसिद्ध होणा-

ऱ्या असल्या कविता पाहिल्या कीं कवितादेवी चैत्र-वैशाखांतील वसंतऋतूला सोडून महिना दीड महिना मागें राहिली आहे कीं काय अशीही शंका एखाद्याला यायची! सुबोध पद्यरचना करण्यांत काव्यविहारी कुशल असल्यामुळें सवंग लोकप्रियतेचा हा मार्ग त्यांना सहज चोखाळतां आला असता; पण केशवसुतांच्या मार्गाखेरीज त्यांना दुसरा मार्ग ठाऊक नाहीं हेंच खरें!

केशवसुतांच्या वाणींतील सुबोधता काव्यविहारींच्या भाषेंतही आढळते. रांगोळी घालणाऱ्या बालिकेचें ते वर्णन करतात.

“ सारविल्या भूमीवरि झरझरा पहा
गौरवर्ण हात हिचा फिरतसे अहा
चपलगती पाहुनियां भासतें मला
धूसरशा मेघावरि फिरत चंचला. ”

‘ बंधुभगिनींनो ’ ऐवजीं ‘ भावांनो आणि बहिणींनो ’ असें श्रोत्यांना उद्देशून म्हणणारे ना. जाधवरावांसारखे बालबोध लोक या कडव्यांतील ‘ धूसर ’ शब्दाला नाक मुरडतील ही गोष्ट निराळी. पण शुभ्र पाण्यांतून खालचा तळ दिसावा त्याप्रमाणें या कडव्यांतून इष्ट अर्थ किती सहज रीतीनें प्रकट झाला आहे! ‘ मनास ’ या कवितेंत जगाकडे पाहणाऱ्या आपल्या नेहमींच्या दृष्टीवर कवीनें आशेचा चष्मा ठेवला आहे. त्यामुळें गारेचा चष्मा वापरणाराला कडक ऊन जसें शीतल भासतें त्याप्रमाणें भोंवतालची परिस्थिति कवीला सुसह्य वाटते. भांबावलेल्या मनाला धीर देतांना तो म्हणतो

“ काल चांदणें गोड बहरलें
आज गगन मेघांनीं भरलें
निर्दाळोनी ढग हे काळे

झळकेल उद्यां नभिं चंद्र पुन्हां !
भिऊं नको मुळिंही मना. "

कल्पनेचें उड्डाण नाहीं, भावनेचा पूर नाहीं. कांहीं नाहीं, पण परिचित कल्पना प्रसन्न रूपानें अवतरल्यामुळें तिच्यांत एक प्रकारची मोहकता उत्पन्न झाली आहे. 'खेड्यांतील देखाव्या' मधलीं खालील दोन कडवीं म्हणजे कुशल छायाचित्रकारानें घेतलेलें ओझरतें पण सफाईदार चित्रच नाहीं का !

"कडु लिंबारे हे दोन तीन या स्थळीं
साळुंक्या करिती किलबिलाट ज्यांवरी
बांधिलें दिसे हें कुणी तयांच्या तळीं
पाल्यांचें खोंपट कसें तरी सांवरून.
खोंपटासमोरी बाळ एक रांगतें
तें दाराआडुनि कुणीतरी पाहतें
सर्वत्र सभोंतीं प्रसन्नता नांदते
खेड्याचें जीवन गोड इथें ये दिसून. "

केशवसुतांच्या सुबोध भाषाशैलीचें अनुकरण 'काव्यविहारीं' प्रमाणें बेहेऱ्यांनींही केलेलें आहे. पण बेहेऱ्यांची वरीचशी कविता गिलावा न केलेल्या दगडी भिंतीसारखी वाटते. काव्यविहारींत त्या मानानें सफाई अधिक आहे.

'सुंदरता वारुणी नव्हे जग हैवान कराया' हा चरण "देव-दानवां नरें निर्मिलें हें मत लोकां कवळूं द्या" या ओळीइतकाच ओजस्वी नाहीं का ! मात्र केशवसुतांच्या परिणत भाषाशैलीचा (वात-चक्र, सतारीचे बोल, हरपलें श्रेय इत्यादि कवनांमधील) परिणाम 'स्फूर्ति-लहरीं'त फारसा दिसून येत नाहीं. गुरूचा रांगडी थाट शिष्यांतही आहे. विशेषतः 'स' वर्गातील कवितांत तो अधिक आढळतो. झांकली मूठ

सव्वा लाखाची त्याप्रमाणें 'स' च्या मागें एखादी आडवी रेघ असेपर्यंत त्या कवितेची किंमत! पण त्या आडव्या रेघेवर 'स्वयंसेवक', 'दुर्जन', 'उपदेश करणारा', 'स्फूर्तिदेवता', 'त्यागदेवता' इत्यादिकांची पलटण कवि उभी करूं लागला कीं खेडवळ मराठी शाळेंतील परवचा म्हणणाऱ्या मुलांची आठवण होते. स्वयंसेवकाला उद्देशून

"ऊठ तूं स्वयंसेवका स्फूर्तिनें ऊठ
स्थिति परी सभोंतालिंची बघुनि घे नीट."

हा पद्याचा श्रीगणेशा म्हणून ठीक दिसेल. पण त्यांत काव्याची इतिश्रीच होते. कवितेंतील मध्यवर्ती कल्पना उत्तुंग अगर भावना हृदयंगम असली तर भाषेचा रुक्षपणा तितकासा जाणवत नाहीं. गगनचुंबी पर्वत बर्फाच्छादित नसला तरी नजर खिळवून टाकतोच कीं नाहीं! लहरींच्या पुष्पवृष्टीनें समुद्र फुलला नसला तरी त्याचें अगाध रूप मनाला मोहिनी घातल्याशिवाय राहतें काय! 'स्फूर्तिलहरीं'तील स्वयंसेवकास, चित्रकार फकीर, स्फूर्तिदेवतेस, गोड कविता, उपदेश करणारास, दुर्जनास वगैरे कविता मनावर परिणाम करूं शकत नाहींत, याचें एक कारण भाषेचा रखरखीतपणा हें म्हणतां येईल. माणसाप्रमाणें भाषेलाही थोडा तरी नाद हवा! या नादाच्या पायीं अर्थाची हानि होऊं नये हें कुणीही कबूल करील. पण नादशून्य सुबोध भाषा काव्याला योग्य असें वातावरण उत्पन्न करूं शकत नाहीं. बालकवि, दत्त, तांबे इत्यादिकांची भाषा प्रसादपूर्ण असूनही नादमधुर आहे. त्यामुळें नर्तकीचें साधें चालणें सुद्धां जसें डौलदार दिसतें, त्याप्रमाणें त्यांच्या सामान्य पद्यांतही मोहकता दृग्गोचर होते. 'चित्रकार फकीर' या कवितेंतील कल्पना 'क्षणांत नाहींसे होणारे दिव्य भास' या केशवसुतांच्या कवितेसारखीच नावीन्यपूर्ण आहे. पण गाडीचे धक्के बसूं लागल्यावर भोंवतालच्या सृष्टीसौंदर्यांत गुंग होऊन जाणारा प्रवासी क्वचित्‌च आढ-

ळायचा ! ‘ कुतुहलें ’, ‘ साम्यता ’, ‘ हूबेहूब ’ इत्यादि सदोष शब्द सोडून दिले तरी

“ हूबेहूब पदार्थ चित्रफलकीं काढोनियां ठेवणें
हाताचा मळ जाहला मजसि तें कांहींही वाटेचना ”

असल्या ओळी रसपरिपोषक कशा होणार ?

गवयाचा आवाज लागल्यावर त्याची खरी गोडी कळते त्याप्रमाणें सामाजिक कवितांत मात्र काव्यविहारींच्या या भाषेनें आवेशयुक्त रूप धारण केलें आहे. त्यांच्या सामाजिक कवितांचे दोन भाग पडतात. पहिला विचारात्मक व दुसरा रूपकात्मक. विचारात्मक कवितांत ‘ अभागी अबले ’, ‘ धर्ममार्तंड ’, ‘ दसरा ’, ‘ मान्याच्या मुलास ’ इत्यादिकांचा समावेश होतो. ‘ अभागी अबले ’ या कवितेंत चुकून पाय घसरलेल्या भगिनीला समाजानें हात देऊन सन्मार्गावर आणावें असें कवींनीं प्रतिपादन केलें आहे. निष्पाप पतितेचा प्रश्न दिवसेंदिवस समाजापुढें निरनिराळ्या स्वरूपांत उभा राहत आहे. आजपर्यंत हें दुर्दैव बालविधवेच्या कपाळींच चिकटविलें जात असे; पण जुनी घडी विसकटून गेली आणि नवी घडी बसली नाहीं अशा या सामाजिक संधिकाळांत ही करुणास्पद परिस्थिति कुमारिकेच्या कपाळींही येऊं शकते, हें पटायला श्रद्धानंद महिलाश्रमाचे अहवालच चाळले पाहिजेत असें नाहीं.

“ प्रमाद घडला तुझ्याकडोनी
रडसी पश्चात्तापें जळुनी
कढणाऱ्या या तव अश्रूंनीं
मालिन्याचे कलंक भगिनी पार धुवोनी गेले ”

असें काव्यविहारी आपल्या कवितेंतील अभागिनीचें समाधान करतात. ‘ जो पापी नसेल त्यानेंच या पतितेवर धोंडा फेंकावा ’ या ख्रिस्ताच्या वाक्याचें

समाजाच्या मनाला विस्मरण होतें, म्हणूनच अनाथ अबलांना चिरडणाऱ्या रूढी थै थै नाचूं शकतात. 'अभागी अबला' ही कविता कवीची सहृदयता व्यक्त करीत असली तरी वाचकांच्या डोळ्यांत अश्रू उभे करण्याइतकी उत्कट मात्र वठलेली नाहीं. ती बाजवीपेक्षां अधिक लांबट झाली आहे. मेलगाडीचा वेग मालगाडीला येत नाहीं ही गोष्ट वाङ्मयांत सुद्धां विसरून चालणार नाहीं. काव्यविहारींना तर या बाबतींत एक मित्रत्वाची सूचना करावीशी मला वाटते. विचारप्रधान काव्य केळ्यासारखें असतें. मैंडौळी, केळ्याप्रमाणें लांब असूनही त्याची विशिष्ट गोडी टिकूं शकते; पण भावगर्भ काव्य द्राक्षासारखें असावें. ' चित्रकार फकीर ' ही लांबलचक कविता सुनीतरूपानें लिहिली असती तर अधिक परिणामकारक वठली असती यांत शंका नाहीं. त्यांच्या ' सदानंदा 'ची वर्डस्वर्थच्या ल्यूसीवरील छोट्या कवितेशीं तुलना केली तरी हेंच दिसून येईल. आणखी उदाहरणच हवें असेल तर 'दसरा' ही कविता पहावी.

दसरा, मान्याच्या मुलास, सेनापतीचा आदेश, इत्यादि कवितांत कवि भूतकाळच्या उज्वल पार्श्वभूमीवर निघालेल्या वर्तमानाच्या भिकार चित्राचा धिःकार करीत आहे. दसरा, संक्रांत, दिवाळी वगैरे सण जवळ आले कीं चार चरणांचा एक पद्यबद्ध प्राणी तयार करण्याच्या नादाला अनेक कविलोक लागतात. त्यामुळें वाचकांना हे सणाचे दिवस म्हणजे एक आपत्तिच वाटते. काव्यविहारींची कविता अशी निव्वळ सणासुदीची नाहीं. तिच्यांत पोटतिडीक आहे, तुटणाऱ्या आंतड्यांचें क्रंदन आहे, डोक्यांत उठलेल्या डोंबाची धग आहे. दसऱ्याचें गोडधोड खात असतांना त्यांची कविता

"हाय ! वीतभर पोटासाठीं
गुरांसारखे बांधव खपती
किती राबती अर्ध्या पोटीं

किती उपाशीं मरुनी जाती.
दारिद्र्याचा वणवा पेटे
तयांत जळती जिवंत प्रेतें ”

ह्या समोरच्या भयाण दृश्याकडे डोळेझांक करूं शकत नाहीं. पण

“ कशास असल्या बावळटांनीं
रुमाल पगड्या सरसावोनी
रस्तोरस्तीं मिरवित जावें
सीमोल्लंघन तया म्हणावें ! ”

हा त्यांनीं केलेला उपहास खुसखुशीत असला तरी तो रसैक्याला थोडासा मारकच होतो. काव्य म्हणजे कांहीं शिवाजीमंदिरांतील वक्तृत्व नव्हे ! ‘ धर्ममार्तंड ’ ही कविता त्यामुळेंच एकांगी वाटते. ‘ मान्याच्या मुलास ’ या कवितेचा आरंभ

“ चाकुनें कापलें बोट निघालें रक्त बघोनी तुला
दरदरुनि घाम सूटला असा कां वद मान्यांच्या मुला ! ”

असा आहे. चाकूला घाबरणाऱ्या या मुलाला त्याच्या पूर्वजांनीं मारलेल्या तलवारीची आठवण कवि करून देत आहे. कवींचा आनुवंशिकतेवर भरवंसा आहे कीं नाहीं हें कळत नाहीं. त्यांचा विश्वास असेल तर शत्रूंच्या रक्ताची रंगपंचमी करणाऱ्या या कुळांत बोट कापल्याबरोबर रंगपंचमीच्या पांच दिवसांपूर्वीच्या सणाची आठवण करून देणारा मुलगा जन्मास यावा हें आश्चर्यच नाहीं का ! वर्तमानकाळ सतेज करायला भूतकाळाकडे नेहमींच पहावें लागणें हें कांहीं फारसें चांगलें नाहीं. त्यांतून सिंहानें मागें वळून पाहिलें तर सिंहावलोकन म्हणून तें शोभून जातें ! पण हरिणानें तसें करणें म्हणजे पुढें पळण्याची ताकद नसल्याची कबुली देण्यासारखेंच आहे. नातवंडाला आजाचा लळा असावा त्याप्रमाणें

भविष्यकाळ पुष्कळदां भूतकाळाला जाऊन बिलगतो हें खरें! पण त्याचा खराखुरा संबंध कांहीं झालें तरी वर्तमानाशींच असतो. दसऱ्या दिवशीं झाडाचा पाचोळा न आणतां कुणी खरें सोनें लुटून आणलें म्हणून तेवढ्यानें आजच्या समाजांतील आर्थिक विषमतेचा प्रश्न सुटणार का आहे? जे सोनें लुटून आणतील त्यांच्याच मालकीचें तें राहील याला तरी ग्वाही काय? एखादा मान्याचा मुलगा भित्रा ठरला तर दुसरा सान्याचा मुलगा उद्यां पराक्रम गाजवील! वाल्मीकि, नेपोलियन, लेनिन, शॉ यांच्या कुठल्या पूर्वजांचीं नांवें इतिहासानें सुवर्णाक्षरानीं नमूद केलीं होतीं? वर्तमानकालाचा निस्तेजपणा पाहून काव्यविहारींना वाटणारी तळमळ उत्कट आहे. पण राखेचा ढिगारा झालेले निखारे फुंकून का कधीं अग्नि प्रज्वलित झाला आहे? त्याला नवें इंधन आणि नवी ठिणगीच हवी!

रूपकात्मक सामाजिक कविता हा 'स्फूर्तिलहरी'चा गाभा म्हणतां येईल. प्रत्येक गवयाचा जसा एखादा मर्जीतला राग असतो, त्याप्रमाणें प्रत्येक लेखकाच्या कल्पनेची एखादी आवडती घडण असते. जाईच्या फुला, हरिणीप्रत, पाळीव पोपटास, मैना, खटारा, तांबडी कण्हेरी इत्यादि या विभागांतील कविता वाचून या कवीचें बळ कशांत आहे याची पूर्ण कल्पना येते. रूपक म्हटलें कीं त्यांत थोडासा कल्पनेच्या कसरतीचा भाग आलाच. त्यांतून या कवितांत सामाजिक टीकाही आहे. पण धांवण्याच्या शर्यतींत मागें रेंगाळणारा मुलगा पोत्यांत पाय घालून धांवायच्या शर्यतींत जसा पुढें सरसावतो, त्याप्रमाणें या पद्धतीच्या काव्यविहारींच्या कविता अधिक सरस वठतात. सूचकता व सौंदर्य यांच्या संगमांतच अशा कवितांचें महत्त्व असतें. खटाऱ्यांतील रूपकांत सौंदर्यहीनतेचें वैगुण्य आहे, तर 'उमलत्या फुला' मधील उपदेशांत सूचकत्वाचा अभाव आहे. बाकीच्या कवितांत हें संमिश्रण कमी अधिक प्रमाणांत सुंदर साधलें आहे. 'गोड जाईच्या फुला'

ही कविता वाचून केवळ कुलहीनतेमुळें तिरस्कारिल्या जाणाऱ्या व्यक्ती-विषयीं कुणाला सहानुभूति वाटणार नाहीं !

कवि निरुपद्रवी हरिणीला उद्देशून म्हणतो—

" आमुच्यांतले हौशी कांहीं
जातीचे शेंदाड शिपाई
गरिबांचे बनतात कसाई
आणि शिकारी आम्ही म्हणुनी मिरविती शेखी भारी !
असेल हिंमत तरि असल्यांनीं
गर्द जंगलामधें घुसोनी
वाघावरती झडप घालुनी
लोळवुनी त्या सार्थ करावें जगांत नाम शिकारी. "

हरिणीच्या डोळ्यांनीं मोहून गेलेले कवि शेंकडों झाले असतील. पण त्या कोमल जीवाची शिकार करणाऱ्यांना असा इषारा देण्याचें मात्र एखाद्यालाच सुचलें असेल ! ' पाळीव पोपटास ', ' मैना ', ' उंबरांतले किडे ', या कविता जितक्या प्रमाणबद्ध तितक्याच परिणामकारक आहेत. या तिन्ही कविता वाचतांना, धुकें विरळ होऊन ओळखीचा प्रदेश दृष्टीला पडावा त्याप्रमाणें रूपकांतून अनुभव प्रकट होऊं लागतो.

" कितितरी फळें पाडाचीं
चोंचीनें फोडायाचीं
ही लीला तव नित्याची
पिंजऱ्यांत अडकुनि आयुष्याची झाली तव माती ! "

ह्या एका कडव्यांत किती कटु सत्यांचा अर्क कवीनें कुशलतेनें भरून ठेवला आहे ! या विस्तृत रूपकाला लवचिकपणा आहे ही गोष्ट निराळीच ! श्रीमंतांच्या आणि सत्ताधाऱ्यांच्या भजनीं लागून स्वत्वाला पारख्या

होणाऱ्या लोकांप्रमाणें समाजांतील पददलित वर्ग, चार भिंतींच्या आंत डांबून ठेवलेल्या बुद्धिवान् स्त्रिया, रूढीच्या घाण्याला जुंपलीं गेलेलीं महत्त्वाकांक्षी मनें, या सर्वांचे मुके कढ या कवितेंत ऐकूं येतात.

केशवसुतांच्या तुतारीविषयीं तांबे म्हणतात, "एक तुतारी द्या मज आणुनि । फुंकिन जी मी स्वप्राणानें" काय म्हणे युगप्रवर्तक गाणें आहे हें! काय परिणाम होतो तुमच्या अंतःकरणावर हें गाणें ऐकून! मोठमोठ्या शब्दांत केलेला उपदेश म्हणा हवें तर याला! कला नव्हे ही!" कल्पना हा काव्याचा आत्मा! पण तिला पदच्युत करून तर्कशुद्ध विचारसरणीची स्थापना असल्या कवितांत केली जाते अशी तांब्यांची तक्रार आहे. काव्य म्हणजे कैफ. (अर्थात् उदात्त)–कैफियत नव्हे, हें त्यांचें म्हणणें मान्य केलेंच पाहिजे. मात्र ही गोड धुंदी अमुक रसानेंच आली पाहिजे असें म्हणतां येणार नाहीं. 'डोळे हे जुल्मि गडे रोखुनि मज पाहुं नका' या तांब्यांच्या ओळींतली माधुरी 'कन्या सासुऱ्यासि जाये' या तुकारामाच्या अभंगांत अनुभवाला येत नाहीं का? काव्याच्या आजपर्यंत इतक्या व्याख्या झाल्या आहेत कीं त्या तोंडपाठ म्हणणारा लोकांच्या दृष्टीनें चालता बोलता कोशच ठरेल. पण घरीं बसून सामुद्रधुनी आणि आखात यांच्या व्याख्या घोकणाऱ्या मुलाच्या डोळ्यांपुढें मातीच्या भिंतीखेरीज दुसरें कोणतें चित्र उभें असतें? व्याख्यांच्या आधारें काव्यास्वाद घेणें हें स्टेथॉस्कोप लावून हृदयांतील प्रेमाचा ठाव पाहण्याइतकेंच शक्य आहे. अगदीं सामान्य वाचकाच्या दृष्टीनें बोलायचें झालें तर काव्य हा मानवी मनाला दिसणारा रम्य भास आहे. तें स्वप्नांतलें स्वप्न आहे. चांदणें कुठेंही पडो, तें माडाच्या राईतून लपंडाव खेळत राहो अगर समुद्राच्या लाटांवर नृत्य करीत बसो, तें जिथें पडतें तिथें लगेच यक्षभूमि निर्माण होते. काव्याची जादूही अशीच असते. अर्थात् काव्याला कल्पना, भावना व तत्त्वचिंतन यांच्यापैकीं कशा-

चेंही वावडें नाहीं. आकाशांतील तारकांनीं फुललेल्या तटांतून वाहणारी मंदाकिनी पृथ्वीवर आल्यावर धनधान्य पिकवते आणि पाताळांत गेल्यावर शापानें दग्ध झालेल्या सगरपुत्रांचा उद्धार करिते. कवितेंत हें मंदाकिनीचें हृदयंगम वैचित्र्य नाहीं असें कोण म्हणेल ? कल्पनेचें सौंदर्य, भावनेचें हृदयस्पर्शित्व अथवा तत्त्वचिंतनाचें तेज ह्यांच्यापैकीं कशानेंही तिच्यावर रम्यता झळकूं लागते. काव्यविहारींच्या रूपकात्मक कवितांत सूचकता व सौंदर्य असल्यामुळें त्या केवळ रुक्ष टीका वाटत नाहींत. त्यांतील भावना अधिक वैयक्तिक असत्या आणि केशवसुतांच्या कल्पनाचमत्कृतीचें देणें काव्यविहारींना लाभलें असतें, तर या कविता निःसंशय अधिक श्रेष्ठ ठरल्या असत्या. आहेत या स्थितींतही उच्च दर्जाचीं रूपकें अगर अन्योक्ति म्हणून त्यांचें मोल कांहीं कमी नाहीं. ‘ भक्ति ग वेणी । माझी गुंफा ग साजणी ’ हें जुनें रूपक निरीश्वरवादी वाचकाला सुद्धां आपल्या चमत्कृतीनें आकर्षून घेतेंच कीं ! ‘ खार आणि घार ’, ‘दोन पतंग’ इत्यादि कवितांवरून काव्यविहारींची ही विशिष्ट शक्ति विकास पावत आहे अशी खात्री होते. सूचकत्वाकडे ते सध्यापेक्षां अधिक लक्ष देतील तर या विशिष्ट विभागांत ते चांगलीच कामगिरी करूं शकतील यांत संशय नाहीं.

ज्यांना आत्मभावनापर म्हणतां येतील अशा कविता या संग्रहांत फारच थोड्या आहेत. एका अर्थानें ही गोष्ट बरी आहे. कारण प्राचीन कवि अपुरे पडल्यामुळेंच कीं काय अर्वाचीन कवींच्या कवितांवरून त्यांच्या चरित्रांचें संशोधन करण्याचें काम सुरू करण्याचा कित्येकांचा इरादा स्पष्ट दिसत आहे. काव्य हा कविचरित्राचा आरसा आहे असें मानणारांनीं सुद्धां आरसे हजारों तऱ्हांचीं प्रतिबिंबें दाखविणारे असूं शकतात, हें विसरतां कामा नये. ज्याचा त्याला सुद्धां आपल्या मनाचा अंत लागत

नाहीं; मग इतरांनीं त्यांत बुडून तळाचा गाळ ढवळण्यांत व तो ढवळतांना आपण मोत्यें शोधीत आहोंत असें मानण्यांत मतलब काय? ‘भगिनीप्रत’ ‘सदानंद’ ‘इषारा’ वगैरे काव्यविहारींच्या अशा प्रकारच्या कवितांत संशोधकांना जरूर असलेलें खाद्य नसल्यामुळें त्यांना दांत ओंठ खात बसावें लागेल; पण भूक कुठलेंही पाप करते या न्यायानें

“ इतिहासीं विख्यात असें त्या राजकुलामाझारीं
जन्म जाहला तुझा आणि मी आहे एक भिकारी ”

असल्या ओळींची अकारण चिकित्सा करण्याचा मोह एखाद्याला होईल म्हणून हें सुचावावें लागलें. प्रेमगीतें लिहिणें हा कांहीं गुन्हा नव्हे; पण तीं वाचून वाचकवर्ग आत्मचरित्रांत सुद्धां कवि लिहिणार नाहीं असल्या गोष्टी जर त्याच्या आयुष्यांत घुसडूं लागला तर त्या बिचाऱ्यानें हे असत्याचे प्रयोग किती दिवस मुकाट्यानें पाहावेत? या दूरदर्शीपणानें कीं काय, काव्यविहारींनीं अशा प्रकारची कविता फारशी लिहिलीच नाहीं. ‘ताई’ हें त्यांचें जवळ जवळ एकुलतें एक सुनीत सरस आहे.

वैचित्र्य ही कलागुणांची एकमेव नसली तरी एक कसोटी ठरायला हरकत नाहीं. पेशवाईतील आनंदीबाईपासून आंग्लाईतील आधुनिक तरुणींपर्यंत चित्रकार धुरंधर जे तेच तेच चेहरे काढतात ते रसिकांचा थोडासा विरस करतातच! पेंढारकरांची गायकी प्रथमतः दणदणीत वाटली तरी त्याच त्याच ताना ऐकतांना कान केव्हां केव्हां बंडाची भाषा बोलतात हें कांहीं खोटें नाहीं. लेखकांचेंही असेंच होतें. आपल्या आवडत्या लेखकाच्या कायम ठशाला कंटाळलेल्या वाचकाला पुढें पुढें त्याच्याविषयीं पूर्ववत् प्रेम वाटेनासें होतें. त्या दृष्टीनें वैचित्र्याची जोपासना करणें हें प्रत्येक कलावंताचें कर्तव्य आहे. ‘स्फूर्तिलहरी’तील ‘राजकन्या हिंदिया’ व ‘सारंगीवाला’ या दोन कविता नेहमींपेक्षां निराळ्या म्हणून कुणाच्याही

डोळ्यांत भरतील. आजपर्यंत राजपुत्र अगर राजकन्या यांच्यावर कविता कमी झाल्या आहेत अशांतला कांहीं भाग नाहीं. हिंदुस्थानांत संस्थानांची संख्या पुष्कळच आहे. प्रत्येक संस्थानांत पांचपन्नास तरी कवि असतातच! त्यामुळें एखाद्या वेळीं राणीसाहेबांप्रमाणें पांचपन्नास कवींनाही डोहाळे लागल्याची वार्ता कानांवर आल्यास कुणी चकित होऊन जाण्याचें कारण नाहीं. माझ्या माहितीच्या एका कवींनीं तर या विषयावरील आपल्या खंडकाव्यांत नर्सचें नांव, पोटांत दुखूं लागल्याची वेळ, जन्मवेळेचीं घटकापळें इत्यादि गोष्टी ग्रथित करण्यांत आपलें कौशल्य खर्च केलें होतें. भावी काळीं काव्य म्हणून नसला तरी इतिहास म्हणून असल्या लिखाणाचा उपयोग होईलही! नाहीं कुणीं म्हणावें? 'हिंदिया' ही अफगाणिस्थानचे पदच्युत राजे अमानुल्ला यांना हिंदुस्थानांत झालेल्या मुलीवरील कविता! कवींनीं या मुलीचें अभिनंदन करून शेजारीं शेजारीं असलेल्या दोन देशांची ती प्रेमग्रंथि व्हावी अशी आशा प्रदर्शित केली आहे. कवीच्या कल्पनेप्रमाणें आशेलाही बंधन नसतें. किपलिंग हिंदुस्तानांत जन्माला आला असला तरी 'पूर्व ती पूर्व आणि पश्चिम ती पश्चिम' हें ठांसून सांगायला त्यानें मुळींच कमी केलें नाहीं! हिंदियेबद्दलची ही आशा काव्यविहारींच्या कवितेबाहेर सफल होण्याचा फारसा संभव नसला तरी तिची गोडी कमी होते असें मात्र नाहीं. काणेकरांनीं 'कवनें' या गीतांत 'मुरलीवाल्या'चा जसा समाचार घेतला आहे तशीच काव्यविहारींनीं सारंगीवाल्याची संभावना केली आहे. ते म्हणतात —

" विरहाग्नीच्या भडकुनि ज्वाला
तयांत कोणी भाजुनि मेला,
प्रेमास्तव कुणि फकीर झाला,
त्या मर्दाचीं गाणीं गातो.

"स्फूर्तीचा आवेश न ज्याला
असलें गाणें ऐकायाला
रिकामवाणा वेळ कुणाला ?
जीवनकलहीं निमग्न जो तो."

यशवंत-गिरीशांनीं 'मनमोहन' म्हणून आळविलेल्या सारंगीवाल्याला केशवकुमार झोंप न मोडण्याबद्दल विनंति करतात. ('झेंडूच्या फुलां'त ही कविता असती तर त्यांनीं फिर्याद करण्याची धमकी दिली असती !) काव्य-बिहारी त्याला वीरश्रीचीं गाणीं गायला सांगतात. सारंगीवाले बहुधा निरक्षर असावेत ! नाहीं तर एवढ्या वेळांत त्यांनीं सभा भरवून पहिल्या दोन कवींचें अभिनंदन व दुसऱ्या दोन कवींचा निषेध करायला कमी केलें नसतें. वैचित्र्याच्या दृष्टीनें 'मंजुळा' व 'माधुरी' या कविता जोडीनें वाचल्यास मौज वाटेल. मंजुळा ही शेरडें राखणारी खेडवळ मुलगी.

"जरतारी पातळ नव्हती ती नेसली,
नोहता फुलांचा गजरा वेणीवरी.
वर्णही नोहता जरी केतकीपरी,
निर्व्याज खुलेपण हीच तिची माधुरी."

या साधेपणानें खुलणाऱ्या शब्दचित्राशेजारीं माधुरींतील सुंदर चित्र ठेवावें.

"शुक्राची चांदणी
उतरली जणुं अस्मानांतुनी
सौधाच्या कोंदणीं
जणूं ही लखलखते हिरकणी."

'मंजुळा' या कवितेंतलें खेडेगांवाविषयींचें कवीचें प्रेम नकली नाहीं. त्याचा उगम स्वभावांत असो वा चिरसहवासानें उत्पन्न होणाऱ्या प्रेमांत असो. हार्डी-टॉलस्टॉयच्या वाचनानें त्याला कदाचित् उजाळाही मिळाला

असेल. पण ‘ खेड्यांतील देखावा ’, ‘ संध्याकाळीं ’ व ‘ मोटेवरलें गाणें ’ या गोड कविता लिहितांना कवि खेडवळ जगाशीं इतका समरस झाला आहे कीं दर दिवशीं त्याचा कायदेकानूंशीं निकट संबंध येत असेल हें क्षणभर खरेंही वाटत नाहीं. ‘ संध्याकाळीं ’ या कवितेंतलें खालील चित्र किती हुबेहूब आहे !

“ वाटेस दुतर्फा गार पिकें पसरलीं
शेतांत शाळुचीं ताटें कणसाळलीं
जांभळा फुलोरा खुले हरभऱ्यावरी
बेफाट पिकानें कोठें लवल्या तुरी.”

मोटेवरल्या गाण्यां ’तल्या खालील मोहक ओळींचा कोणत्या रसिकाला विसर पडेल ?

“ विहीर रेखिव तियेंत भरलें निवळशंख पाणी
माचाड उंच वरुनी-आंत जणु बघतें वांकोनी.
× × ×
रंगुनियां लागला उंसाचा फड डोलायला
लागलें वेड मक्याणाला तुऱ्यांचा नाच सुरू झाला.”

कृष्णेचा पुलावरून ’ ही कविता या सर्व संग्रहांत निराळ्याच घाटा-थाटाची आहे. सांगलीच्या तांब्यांत नाशिकचा तांब्या जसा दुरूनही ओळखतां येतो, तशी ती दिसते. नदीच्या पुलावरून खालचें पाणी पाहण्यांत नेहमींच मौज वाटते. पण कवीला कृष्णाबाईच्या पाण्यांत गेल्या हजार वर्षांतील काळाचें प्रतिबिंब दिसूं लागतें.

“ सरसावे यांत्रिक कला
नच कौतुक वाटे हिला तयाचें कांहीं.”

"अज्ञात अनंतांतुनी
ये मागुनि ही कोठुनी
वाहते तशी वाहुनी
अज्ञात अनंतामधें लीन ही होई;
ही अशीच येथुनि खालीं वाहत जाई."

या ओळी वाचणाराला नेहमींचे न्यायाधीश काव्यविहारी येथें नाहींत असें वाटल्याशिवाय राहणार नाहीं.

'स्फूर्तिलहरी' वाचणाराला केशवसुतांखेरीज दुसऱ्या कोणत्याही कवीचा परिणाम काव्यविहारींवर झाला आहे असें वाटणार नाहीं. मात्र केशवसुतांच्या कवितेच्या सामाजिक भागाचाच परिणाम त्यांच्यावर अधिक झाला आहे यांत संशय नाहीं. प्रो. माधवराव पटवर्धनांनीं केलेली केशवसुतांच्या कवितेची चिकित्सा (अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवक) अत्यंत मार्मिक आहे. पण मार्मिकता आणि रसिकता या सवतीसवतींना सलोख्यानें नांदविणें नेहमींच मोठें कठीण असतें. 'मंजुळा', 'संध्याकाळीं', 'मोटेवरलें गाणें' इत्यादि कविता वाचतांना जें रम्य चित्र उत्पन्न होतें तें खेड्यांतील स्थिति पाहिलेल्यांना अवास्तव वाटणारच नाहीं असें कुणीं म्हणावें! 'संध्याकाळीं' या कवितेंत घरीं परत येतांना कवीला दारू पिऊन रस्त्यानें झिंगत जाणारीं माणसें कशीं दिसलीं नाहींत असें कुणीं विचारलें तर त्याचें उत्तर काय द्यायचें? माझ्यापुढें आतां एक पत्र पडलें आहे : "तुमच्या सहवासांत घालविलेल्या छत्तीस तासांचा विसर कधींही पडणार नाहीं" असें त्यांत लिहिलें आहे. छत्तीस तासांतील दोन्ही रात्रीं सदरहू गृहस्थ गाढ झोंपीं गेले होते. आतां उत्तर पाठवितांना मीं जर त्यांना लिहिलें — "तुमच्या पत्रांतील आंकडा अजीबाद चुकला आहे. झोंपेचे आठ आठ तास या आंकड्यांतून आधीं बाद करा. आंघोळ,

जेवण वगैरे गोष्टींत लागलेला वेळही वजा केला पाहिजे. कारण त्या वेळीं आपलें संभाषण सुद्धां सुरू नव्हतें. सर्व हिशेब झाल्यानंतर जे दहा पंधरा तास आपण एकमेकांच्या सहवासांत घालविले असतील त्यांचा तुमच्याप्रमाणेंच मलाही विसर पडणार नाहीं, याची खात्री असूं द्यावी "– तर! ज्या वेळीं ते गृहस्थ हें उत्तर वाचतील त्या वेळीं मी तिथें नसेन ही आनंदाची गोष्ट आहे! नाहींतर! बाकी छत्तीस तासांच्या सुखद सहवासापेक्षां असल्या पत्राचीच त्यांना जन्मभर आठवण राहील! काव्यांतील कल्पना-भावनांकडे पाहण्याची दृष्टि चिकित्सक असावी; पण चिकित्सा म्हणजे चिरफाड नव्हे! केशवसुतांनीं चंडोल व कलहंस यांच्याविषयींचे परकीय कविसंकेत आणले म्हणून कुरकूर करण्यांत मतलब काय? पाहिलेल्या पलीकडे जायचें नाहीं म्हटलें तर पक्ष्यांत चिमणी-कावळा व पशूंत कुत्रा-मांजर हीच कविसंकेतांची सीमा व्हायची! काव्य हें अनुभव व कल्पना यांचेंच अपत्य असतें. नाहीं कोण म्हणतो? दोन्हींपैकीं एकाच्या मायेला तें पारखें झालें तरी त्याची आबाळ व्हायची हें ठरलेलेंच आहे. समाजाची संक्रमणावस्था, प्रतिभेच्या मर्यादा, नवखेपणामुळें होणारा गोंधळ, या सर्वांचें प्रतिबिंब केशवसुतांच्या काव्यांत आढळतें. वर्डस्वर्थ व शेले या दोघांचेही काव्यगुण त्यांनीं एकत्रित आणण्याचा प्रयत्न केला. पण प्रसन्नतेची शोभा व पुराचें वैभव नदीच्या पाण्यांत एकाच वेळीं कसें दिसणार? कोणत्याही कलाकृतीच्या तीन निरनिराळ्या कसोट्या असतात. व्यक्ति, काल व मानवता. यांपैकीं शेवटच्या कडक कसोटीनें पाहिलें तर केशवसुतांचें सोडाच, कालिदासाचें काव्यही थोडेंसें हिणकस ठरल्याशिवाय राहणार नाहीं. एका प्रख्यात इंग्रज लेखकानें ताजमहालाची घोडशाळा म्हणून संभावना केली आहे. बिचारा शहाजहानाच्या काळीं दिल्लींत जन्माला आला असता

तर तो या कलामंदिरावर सुंदर गज्जल रचूनही मोकळा झाला असता! केशवसुतांच्या गुणदोषांचा काव्यविहारींच्या काव्यावरही परिणाम झाला आहे. केशवसुतांचें अंधानुकरण त्यांनीं केलें आहे असें नाहीं; पण केशवसुतांचा काळ व आपला काळ यांतील अंतर मात्र ते अनेकदां विसरतात. केशवसुतांना वर्डस्वर्थप्रमाणें बोलण्याची भाषा काव्याला वापरून दाखवायची होती. पंडित कवींच्या संस्कृतप्राचुर्याविरुद्ध पुकारलेलें तें बंड होतें. बंडखोर म्हटला कीं आपल्या घोड्यांच्या टापांखालीं फुलें चुरडलीं जात आहेत याचें त्याला भानच नसतें. 'भाषा साधी, शुद्ध मराठी' करतांना ती खडबडीत, प्रसंगीं दडदडीत झाली तरी त्याची दिक्कत केशवसुतांनीं बाळगिली नाहीं. पण एक पिढी मागाहून येऊनही काव्यविहारींनीं भाषेचा तोच कित्ता आपल्यापुढें ठेविला. याचा परिणाम त्यांच्या कांहीं कवितांना चांगलाच भोंवला आहे. भावगीताचा मुख्य गुण म्हणजे जीवनाविषयक उत्कट आर्तता! गांवीं गेलेल्या मित्राची खोली लागलेली पाहून केशवसुत व्याकुळतेनें स्मृतिचित्र रेखाटतात —

"देशाविषयीं गोष्टी बोलत येथें
बसलों, विसरुनि कितीकदां निद्रेतें
श्वासीं अमुचे श्वास मिळाले तेव्हां
अश्रूंमध्यें अश्रु गळाले तेव्हां."

अस्ताला जाणाऱ्या सूर्याचा पुन्हा उद्यां उदय होणार ही कल्पना मनांत येतांच ते कळवळ्यानें उद्गारतात —

"देवा! केव्हां परवशपणाची निशा ही सरून
स्वातंत्र्याचा द्युमणि उदया यावयाचा फिरून!"

परगांवीं जायच्या वेळीं पत्नीविरहानें डोळ्यांत आंसवें आणणारा हा तरुण देशोद्धाराकरितां तुतारींतून सूर काढतो—

" धार धरिलिया प्यार जिवावर
रडोत रडतिल रांडा पोरें
गत शतकांचीं पापें घोरें
क्षालायाला तुमचीं रुधिरें
पाहिजेत रे स्त्रैण न व्हा तर ! "

'गोष्टी घराकडिल मी वदतां गड्या रे' या गोड कौटुंबिक कवितेपासून 'हरपलें श्रेय' या उदास चिंतनपर कवितेपर्यंत केशवसुतांची विविध आर्तता सर्वत्र दृष्टीस पडते. काव्यविहारींनीं या गुरुगुणाकडे अधिक लक्ष पुरवायला पाहिजे. जीवितांतले कडू-गोड अनुभव उत्कटतेनें घेणाऱ्या कवीचे उद्गारच अधिक हृदयस्पर्शी होतात. शिवाय काव्याचा समाजजीवनाशीं निकट संबंध असला तरी व्यक्तींच्या भावनांच्या द्वारेंच तो प्रकट व्हायला नको का ? विसावें शतक एकंदरींत काव्याला असावें तितकें अनुकूल नाहीं असें म्हणतात. नसेलही ! पण कवीची आर्त वृत्ति फुलवून सोडणारे प्रसंग आजच्या समाजांत थोडेथोडके आहेत का ? क्रौंच पक्ष्यांच्या जोडप्यांतील एकाला निषादानें मारतांच आद्य कवीला काव्यस्फूर्ति झाली. आजच्या जगांत तरी असले क्रूर निषाद कुठें कमी झाले आहेत ? इथें कायद्यांच्या तर तिथें रूढींच्या रूपानें अवतरून निरपराधी कोमल जीवांना ते हरघडीं यमसदनाला पाठवीत आहेत. त्या तडफडणाऱ्या निष्पाप पांखरांच्या फडफडाटाबरोबर ज्याचें हृदय थरकांपेल त्या कवीला आजच्या काळांतही उच्च दर्जाचें काव्य निर्माण करतां येईल.

काव्यविहारींच्या समाजटीकापर काव्यांचा आधुनिक मराठी काव्यविवेचकाला आवर्जून उल्लेख करावाच लागेल; मात्र त्यांतही अजून ते केशवसुतांच्या जुन्या जगांतच आहेत, असा वारंवार भास होतो. समाजाच्या हृदयाचे आजचे बोल ते ऐकून घेतील तर फार बरें होईल.

ताज्या वनस्पतींचें औषध जसें अधिक गुणकारी त्याप्रमाणें समाजाचें या क्षणींचें जीवन ललितवाङ्मयाला अधिक पोषक. निव्वळ प्रचार हें कोणत्याही कलेचें ध्येय नाहीं. कलागुण नसलेल्या वाङ्मयांतील मतप्रचार अप्सरांना पाहून त्यांना दाढीमिशा कां नसाव्यात म्हणून कोड्यांत पडणाऱ्या ऋष्यशृंगासारखा हास्यास्पद ठरतो. कलावंत अभ्यासु व आत्म-परीक्षक असला तर रुक्ष तत्त्वप्रतिपादनाला कलेचें गोंडस स्वरूप प्राप्त करून देणें कांहीं त्याला कठिण नाहीं. भाऊराव कोल्हटकरांनीं स्त्रीवेषानें जाऊन हळदीकुंकू घेतल्याची आख्यायिका प्रत्येकाच्या परिचयाची आहे. थोर व्यक्ति दिवंगत झाली कीं तिच्यावर आपल्याकडेही कविता होतात. ( पुण्यांतल्या एका कवींच्या या बाबतींतील तत्परतेवरून त्यांनीं या कामाचा मक्ता घेतला आहे असें यंदाच्या ज्ञानप्रकाशाच्या अंकांवरून वाटतें. ) पण अॅब्राहाम लिंकनच्या मृत्यूवरील ‘Captain, O my captain’ या कवितेसारखी सरस कविता आपल्याकडे क्वचित्‌च आढळते ! वाचन, मनन, निरीक्षण व काव्यदृष्टि सतेज राहावी म्हणून आपल्या मनाला लावून घेतलेलें वळण या सर्वांचा संगम कवितेला उठावदारपणा आणायला निःसंशय उपकारक होतो. आमच्या आजच्या काव्यप्रांतांत या कसोटीला उतरतील असे कवि फारच थोडे आहेत. तांबे व माधवज्यूलियन यांच्या कवितेंत जीवनाच्या प्रत्येक हांकेला ओ देण्याची जी उत्सुकता दिसते ती एकंदरींत दुर्मिळच नाहीं का ? यशवंतांच्या काव्यांतील कारुण्य व कल्पकता यांचा मनोहर संगमही असाच आहे. चंद्रशेखर—गिरीशांसारखे शब्दशिल्प आणि काणेकर-बोरकरां-सारखी चमकदार कल्पकता हे गुण तरी कुठें विपुलतेनें पहावयाला मिळ-तात ? पावसाळ्याच्या आरंभीं मेघ गडगडत आहेत, विजा चमकत आहेत, पावसाच्या सरीवर सरी कोसळत आहेत, असें जें भव्य रम्य दृश्य दिसतें त्याची आठवण या कवींच्या कांहीं कविता वाचतांना होते. काव्य-

विहारींची कविता वाचून पावसाचा देखावा डोळ्यांपुढें उभा राहतो; पण तो वळवाच्या पावसाचा! तिच्यांत हटाकृष्ट असें कांहींच नाहीं. वळवाची सर फटकन् येते, धूळ बसविते, गारवा आणते, आणि झरकन् निघून जाते. पण तेवढ्या सरीनें सारी सृष्टि क्षणार्धांत प्रसन्न होते. काव्यविहारींच्या 'मोटेवरलें गाणें', 'संध्याकाळीं', 'मैना', 'पिंजऱ्यांतील पोपटास' या कविता वाचून असाच अनुभव वाचकांना येईल. या कवितांतील प्रसादाप्रमाणें उदात्त बैठक हाही काव्यविहारींचा विशेष आहे. शृंगारिक कवितेकडे त्यांचा ओढा नाहीं हें खरें! पण चांगले चांगले कवि 'रतलें परपुरुषाहीं' अशा ओळी लिहून त्या पारमार्थिक बनविण्याचा खटाटोप करायला जिथें मागें पुढें पाहत नाहींत तिथें त्यांच्या या बाबतींतील स्वाभाविक संयमाचें कौतुक वाटण्यांत अनुचित असें काय आहे! कल्पकतेचें व आर्ततेचें देणें त्यांना नाहीं असें नाहीं; पण त्यापेक्षांही ध्येयवादाची आवड त्यांना अधिक आहे. त्यांची कविता युद्धांत वीरश्रीनें लढणाऱ्या शिपायाच्या मनोवृत्तीची आठवण करून देणारी आहे असें म्हटलें तरी चालेल. जन्मभूमीचें गोड वैशिष्टय कवीच्या काव्यांत कुठून तरी प्रकट होतें असें वाटतें. नाहींतर गोदातटाकींच्या चंद्रशेखरांची कविता द्राक्षांच्या घोंसाप्रमाणें भरदार दिसावी, कारे-बोरकरांच्या कविता कलमी आंब्याच्या फोडीसारख्या भासाव्या आणि नागपूरवऱ्हाडकडील आ. रा., गु. ह. व वा. ना. या देशपांडे-त्रयीचीं कवनें सोलून खायच्या संत्र्याप्रमाणें वाटावींत, याचें दुसरें कारण काय द्यायचें! साहित्याच्या या विशिष्ट दृष्टीनें बोलायचें तर काव्यविहारींच्या कविता म्हणजे कृष्णाकांठच्या मळींतील कोंवळीं कणसें आहेत. तीं भाजून खाण्याची सुद्धां जरूरी नाहीं!

प्रस्तावना म्हणजे बोहल्यावर वधूवरांमध्यें धरण्यांत येणारा अंतरपाटच म्हणायचा. अंतरपाटाची कल्पना शोधून काढणारा कल्पक जातिवंत कवि

तरी असला पाहिजे किंवा अट्टल भामटा तरी असला पाहिजे. काव्य म्हणजे वस्तुस्थितीवर कल्पनेनें चढविलेला सौंदर्याचा साज ! अंतरपाटा-आड उभ्या राहिलेल्या वधूवरांच्या उत्कंठित मनःस्थितीची अशी काव्य-मयता कोण नाकारील ? मात्र आधीं एक मुलगी दाखवून बोहल्या-वर दुसरी उभी करण्याचा डाव साधायलाही अंतरपाटच उपयोगी पडण्याचा संभव असतो ! तशांतला कांहीं प्रकार मीं या प्रस्तावनेंत केला नसावा असें वाटतें. काव्यविहारींची कविता जशी आहे तशीच मीं उभी केली आहे. आतां कन्यादानाच्या वेळीं वधू अष्टपुत्री नेसलेलीच दिसते ! पण हा माझा दोष नसून या विवाहपद्धतीचा आहे. कदाचित् ही प्रस्तावना रसिकवृंद व काव्यविहारी या दोघांपैकीं एकाला — किंबहुना दोघांनाही — आवडणार नाहीं. परंतु अंतरपाटानें त्याची तरी फिकीर कां करावी ? अंतरपाट दोन्ही पक्षांना पसंत पडला तरी शेवटीं त्याची रवानगी उपाध्यायाच्याच घरीं व्हायची असते. नाहीं का ?

शिरोडें
ता. २१-१२-३५

वि. स. खांडेकर

## ‘स्फूर्तिलहरी’चे लेखक



श्रीयुत ‘काव्यविहारी’

# निवेदन



'स्फूर्तिलहरी' आणि प्रेमळ रसिक यांमधील श्री. खांडेकरांचा औरस-चौरस अंतरपाट आतां दूर सरल्यानंतर 'स्फूर्तिलहरी' संबंधीं वाचकांशीं थोडें हितगुज मला करावयाचें आहे. 'स्फूर्तिलहरी' प्रेमळ वाचकांच्या हातीं देतांना पुष्कळ दिवसांचा संकल्प सिद्धीस गेल्याबद्दल मला साहजिकच आनंद होत आहे. इ. स. १९२३ सालीं 'काव्यविहार' हा माझा पहिला काव्यसंग्रह प्रसिद्ध झाला. आणि एक तपाच्या दीर्घ कालानंतर आज हा दुसरा काव्यसंग्रह हातावेगळा होत आहे. एवढया दीर्घ कालाच्या मानानें 'स्फूर्तिलहरीं'तील कवितांची संख्या अल्प आहे, याची जाणीव मला आहे. परंतु तर्ककर्कश कायद्याच्या विवेचनांत आणि वादीप्रतिवादींच्या धूमधडाक्यांत याहून अधिक कविता लिहिणें मला शक्यच झालें नाहीं. त्यांतूनही जेवढी कविता मला लिहितां आली तेवढी त्या त्या वेळीं 'मनोरंजन', 'यशवंत', 'किर्लोस्कर', 'स्त्री', 'केसरी' वगैरे नियतकालिकांतून प्रसिद्ध झाली आहे; आणि तीच संकलित स्वरूपांत आज मीं प्रेमळ वाचकांपुढें ठेविली आहे.

भावनांच्या अगर विषयाच्या दृष्टीनें कवितांचें वर्गीकरण करण्यापेक्षां त्यांचा कालानुक्रमच ठेवणें मला इष्ट वाटल्यावरून 'स्फूर्तिलहरीं'न तशी

योजना केली आहे. फक्त 'उदयकाल' ही कविता मंगलाचरणासारखी असल्यानें कालानुक्रमाचे दृष्टीनें ती नंतरची असली तरी प्रथम घेतली आहे. माझ्या कवितेसाठीं योजलेलीं थोडींच वृत्तें जुनीं आहेत. बरी-चशी कविता रूढ वृत्तें व जाति यांच्या साच्यांत बसण्यासारखी नसली तरी नवीन चालींची जोड तिला दिली असल्यामुळें भावनानुरूप रागदारींत ती सहज म्हणतां येण्यासारखी आहे.

गेलीं दहा बारा वर्षें मराठी काव्याच्या इतिहासांत महत्त्वाचीं समजली जातील. गडकरी व बालकवींच्या वेळीं मासिकांतून व क्वचित् पुस्तकांतून दिसणारी मराठी कविता काव्यगायनाचा महादरवाजा सताड उघडा झाल्या-मुळें आज घरोघर झाली आहे. इतकेंच नव्हे तर ग्रामोफोनच्या तबकडीवरून रुपेरी पडद्यावर जाऊन तेथून तिनें रेडिओंत प्रवेश केलेला आहे. अशा रीतीनें मराठी कवितेचें पाऊल लोकप्रियतेच्या मार्गावर झपाट्यानें पुढें पडलें असलें तरी या लोकप्रियतेच्या नादानें केवळ लोकरंजन हेंच ध्येय मराठी कवितेपुढें राहून देशकालपरिस्थितीकडे तिचें दुर्लक्ष्य झालें ही गोष्ट नाकबूल करितां येणार नाहीं. भोंवतालची भयाण परिस्थिति विसरून फक्त प्रेम आणि विरह यांचेच चाळे मराठी कविता आज बहुतांशीं करतांना दिसते आहे. कर्तव्यपराङ्मुख अर्जुनाला गीतेचा ओजस्वी उपदेश करून कर्मवीर बन-विणारा भगवान् श्रीकृष्ण मराठी कवितेला दिसूं नये आणि यमुनाकांठच्या कुंजांत गोपींबरोबर प्रणयविलास करणारा मुरलीवाला कृष्ण मराठी कवि-तेंत मनसोक्त विहरावा हें कशाचें द्योतक आहे? गेल्या महायुद्धानें सर्व जग हादरून जाऊन नंतरच्या संक्रमणकाळांत वेगळ्या विचारांचे वारे वाहूं लागले आहेत; जगभर बेकारी माजून तिचे परिणाम याहि देशाला भोगावे लागत आहेत; दारिद्र्यानें देश हैराण झाला आहे; या निराशाजनक परिस्थितीचें चित्र मराठी कादंबरींत दिसतें आणि मराठी कवितेंत तें कां दिसत नाहीं? "कादंबरी

गातां येत नाहीं आणि कविता गातां येते म्हणून " असें खवचट उत्तर कोणीं दिलें तर तें खरें उत्तर नव्हे. खरें उत्तर म्हणजे प्रेमविलासांत रंगलेल्या हल्लींच्या मराठी कवितेला भोंवतालची परिस्थिति दिसलीच नाहीं. उत्कट प्रेम अगर विरह काव्याला उत्तम विषय होऊं शकतो. तांबे, माधव ज्यूलियन्, यशवंत, गिरीश यांनीं या विषयावर सुंदर व विपुल कविता लिहिली आहे. परंतु या विषयाबरोबर त्यांनीं इतर सामाजिक विषयहि तितक्याच कुशलतेनें हाताळाले आहेत. तथापि या नामवंत कवींचें अंधानुकरण करणारांत अस्सलांची उत्कटता व बहुविधता नसल्यामुळें व प्रेम आणि विरह यांचीच घोकणी त्यांनीं सारखी चालू केल्यामुळें मराठी कविता म्हणजे आज चेष्टेचा विषय होऊन राहिली आहे. ही स्थिति पालटल्याशिवाय मराठी कवितेला चांगले दिवस येणार नाहींत. गेल्या दहा बारा वर्षांत परिस्थितीमुळें माझ्या मनाची घडणच विशिष्ट तऱ्हेची बनल्यामुळें मऊ-गुळगुळीत कविता मी लिहूंच शकलों नाहीं. ठराविक वळणाच्या कवितेहून थोडीशी निराळ्या वळणाची कविता लिहिण्याचा अल्प प्रयत्न या काळांत मजकडून झाला आहे. हा प्रयत्न अगदीं अल्प आहे याची जाणीव मला पूर्णपणें आहे. या काळांत मीं जें जें वाचलें, पाहिलें ऐकलें व अनुभवलें, त्याचें शब्दचित्र म्हणजेच 'स्फूर्तिलहरीं'तील कविता होय. माझी भूमिका स्पष्ट करण्यासाठीं हल्लींच्या मराठी कवितेबद्दल मला थोडेंसें लिहावें लागलें आहे, याबद्दल वाचकांनीं मला क्षमा करावी.

महाराष्ट्राच्या कोपऱ्यांत राहणाऱ्या माझ्यासारख्याचें प्रकाशन म्हणजे " आवळ्यांची मोट " बांधण्याइतकेंच दुष्कर आहे. माझ्या या प्रकाशनाचे कामीं आरंभापासून ज्या ज्या व्यक्तींचें साहाय्य मला झालें त्यांचा आभारपूर्वक उल्लेख करणें हें माझें कर्तव्य आहे. आभारांच्या यादींत पहिलें नांव मिरजमळा संस्थानचे अधिपति श्रीमंत माधवराव बाबासाहेब

पटवर्धन यांचें आहे. इ. स. १९१२ सालीं माझी मॅट्रिकची परीक्षा पास झाल्यानंतर उच्च शिक्षणार्थ साहाय्यासाठीं मी दाहिदिशा पाहत असतां श्रीमंतांनीं मदतीचा हात पुढें केला नसता तर शिक्षणासाठीं तळमणाऱ्या मनानें जीवनप्रवाहांत मी कोठें वाहवत गेलों असतों याची कल्पनाही करवत नाहीं. माझ्या उच्च शिक्षणाला सर्वस्वीं मदत करून श्रीमंतांनीं मला उपकृत केलें. उच्च शिक्षणाचे संस्कार झालेल्या माझ्या मनाचे बोल म्हणजेच माझी कविता होय. श्रीमंतांबद्दल मला वाटत असलेल्या आदराचें व कृतज्ञतेचें द्योतक म्हणून मीं माझा पहिला काव्यसंग्रह ‘ काव्यविहार ’ श्रीमंतांना अर्पण केलाच आहे. त्यानंतर माझी नोकरी सांभाळून सांगलीच्या विलिंग्डन कॉलेजांत मराठीच्या अध्यापकाचें काम करण्यास श्रीमंतांनीं उदार अंतःकरणानें मला परवानगी दिली. यामुळें प्राचीन व अर्वाचीन मराठी वाङ्मयाचा साहजिकपणें अभ्यास घडून त्याचा माझ्या वाङ्मयव्यवसायास फार उपयोग झाला. दयाळू श्रीमंत बाबासाहेब व वाङ्मयप्रेमी श्रीमंत सौ. राणीसाहेब यांचें अढळ कृपाछत्र माझ्यावर आहे म्हणूनच जबाबदारीची नोकरी सांभाळून अल्पस्वल्प वाङ्मय-सेवा मला करितां आली. माझ्यावर अपत्यनिर्विशेष प्रेम करून माझ्या लेखनास आरंभापासून प्रोत्साहन दिल्याबद्दल मी श्रीमंत बाबासाहेब व श्रीमंत सौ. राणीसाहेब यांचा जन्माचा ऋणी आहें.

औंध संस्थानचे कलानिष्ठ व साहित्यप्रेमी अधिपति श्रीमंत बाळा-साहेब पंतप्रतिनिधि यांना ‘ स्फूर्तिलहरी ’ अर्पण करून घेण्याबद्दल मीं विनंति करितांच श्रीमंतांनीं उदार अंतःकरणानें मला तशी परवानगी दिली आणि ‘ स्फूर्तिलहरी ’ वर मार्मिक अभिप्राय देऊन मला उपकृत केलें. या उपकाराबद्दल श्रीमंत बाळासाहेब यांचे आभार मानावे तेवढे थोडेच आहेत.

सुप्रसिद्ध साहित्यिक श्रीयुत भाऊसाहेब खांडेकर हे व मी उभयतां सांगली हायस्कूलचे विद्यार्थी. माझे जुने स्नेही या नात्यानें मीं त्यांना 'स्फूर्तिलहरी'साठीं प्रस्तावना लिहिण्याची विनंति केली. तिला मान देऊन आपल्या विद्वत्तेस साजेसा प्रस्तावनेचा विस्तृत व मार्मिक अंतरपाट त्यांनीं उभा केला. माझ्या पद्यास आपलें सुंदर गद्य जोडून आम्हां उभयतांमधील स्नेहबंधनास त्यांनीं कायमची निरगांठ दिली याचें साभार स्मरण मला सदैव राहील.

माझ्या काव्याकडे आपुलकीनें पाहणारे गीता-वेदान्त-वाचस्पति सदाशिवशास्त्री भिडे यांनीं 'स्फूर्तिलहरीं'वर विद्वत्ताप्रचुर अभिप्राय दिला; कांहीं कवितांवर दिलेलीं वृत्तांचीं व जातींचीं नांवें कविमित्र प्रो. माधवराव पटवर्धन यांनीं सुचविलीं. कविमित्र प्रो. शंकरराव कानेटकर (गिरीश) यांनीं कवितांचीं मुद्रितें तपासणेच्या कामीं आपुलकीनें मदत केली; माझे सांगलीचे मावसबंधु मा. द. गोखले, पेंटर, यांनीं वेष्टणावरील सुंदर चित्र तयार करून दिलें. माझ्या प्रकाशनास वरील स्नेह्यांनीं केलेल्या साहाय्याबद्दल मी त्यांचा आभारी आहें.

याशिवाय इंदूरचे श्रीमंत सरदार माधवराव किबे, बडोद्याचे मे. राजरत्न माने पाटील, औंधचे पंडित सातवळेकर, पुण्याचे प्रि. अत्रे, श्री. ना. वि. कुलकर्णी, किर्लोस्करवाडीचे श्रीयुत शंकरराव किर्लोस्कर व रा. ताम्हणकर, बेळगांवचे डॉ. साठे, कागलचे श्रीयुत दोशी व कविमित्र वासुदेवसुत कारेकर, विद्यार्थीमित्र द. के. बर्वे व बुधगांवचे मराठे फोटोग्राफर या सर्व सुहृदांनीं माझ्या कवितेवर व माझ्यावर आजपर्यंत केलेल्या निर्हेतुक लोभाबद्दल त्यांचा साभार नामनिर्देश येथें केल्यावांचून माझ्यानें राहवत नाहीं.

लांबलेलें निवेदन संपलें. गरिबाचे मंगलकार्यास अनेकांची मदत लागावी त्याचपैकीं माझ्या प्रकाशनाचा प्रकार झाला आहे. अनेकांनीं मला आपले-

पणानें साहाय्य केलें म्हणूनच माझें प्रकाशनाचें काम सुकर झालें. माझ्या सर्व साहाय्यकर्त्यांचा नामनिर्देश करणें शक्य नाहीं. चुकून कोणाचा नामनिर्देश राहून गेला असेल तर त्यांनीं मला क्षमा करावी. सरते शेवटीं ज्या जगच्चालक प्रभूच्या कृपेनें मला थोडी फार वाङ्मयसेवा करितां आली त्याच्या चरणीं माझी एवढीच प्रार्थना आहे कीं

" मंगलमय विश्व सकल होउंदे दयाळा ! "

बुधगांव,
२९।१२।१९३५

रसिकांचा नम्र,
काव्यविहारी

# अनुक्रमणिका



---

# स्फूर्तिलहरी



## उदयकाल

[ रागः— तिलककामोद ]

रम्य उदयकाल अहा ! येइ भारतावरी ॥ ध्रु० ॥
काळोखीं भूमितळीं
उन्मादें नाचलीं
कलहपिशाच्चें सगळीं
दिनमणि येणार बघुनि दाहिदिशां धांवलीं ॥ १ ॥
हटला अज्ञानतिमिर
सुखकर सुटला समीर
भारतासि येइ धीर
झळकतसे दीप्ति बघुनि रम्य उदयगिरिवरी ॥ २ ॥

देशहितास्तव निशिदिनिं
स्वार्थाचा होम करुनि
झटती जे कर्ममुनी
अर्घ्य द्यावयास उभे सज्ज करुनि अंजली ॥ ३ ॥
भारतिंचे अमित भाट
उल्हासुनि अंतरांत
सुस्वागतगीत गात
'काव्यविहारी' तयांत मिळवि तान आपुली
रम्य उदयकाल अहा ! येइ भारतावरी ॥ ४ ॥

बुधगांव, २१।९।१९२७

# सौंदर्य म्हणजे

( जाति – दोहा )

अंगिकारुनी मादकता, नटवेगिरिचा नूर
दावित दावित देवोनी, हुरळबाजिला जोर
उच्छृंखल बेभानपणें, उगाच फडकायाचें
नाहीं हें उद्दिष्ट कधीं, जगांत सौंदर्याचें. १

*　　*　　*

कांचपात्र कांठून जशी लाल वारुणी उसळे,
जळजळत्या उद्दामपणें, आंदोलत फेंसाळे,
यायोगें आव्हान करी, जगास घुटका घ्याया,
सुंदरता वारुणी नव्हे, जग हैवान कराया. २

*　　*　　*

पावित्र्यानें नमवीतें जें दुनियेला पायीं,
जयाभोंवतीं मोहकता अविरत गुंगत राही,
फिकट ज्यापुढें, तारांचें तेजस्वी ऐश्वर्य,
“मेल्याला जीवंत करी,” तेंच खरें सौंदर्य. ३

बुधगांव, १६।७।१९२३

# दसरा

[ राष्ट्राच्या वैभवकाळीं दसरे कसे साजरे होत असत आणि हल्लींच्या अवनतीच्या काळांत आपण ते कसे साजरे करितों, याचें तुलनात्मक चित्र खालील कवितेंत रेखाटण्याचा प्रयत्न केला आहे. ]

१

गेली अश्विन शुद्ध अष्टमी
काल जाहली खांडेनवमी
शस्त्रें नव्हतीं पुजावयाला
क्षिती तयाची परि न अम्हांला;
विळे फावडीं खुरपीं पुजुनी
शस्त्रपुजेची जंगजोडणी
करुनी मोठ्या उत्साहानें
उठतां नवरात्राचें ठाणें
आनंदानें टाळ्या पिटुनी म्हणतों आला दसरा;
जिथें दैन्य थैमान घालितें तिथें कशाचा दसरा ?

२

हाय ! वीतभर पोटासाठीं
गुरांसारखे बांधव खपती
किती राबती अर्ध्यापोटीं;
किती उपाशी मरुनी जाती;
दारिद्र्याचा वणवा पेटे,
तयांत जळती जिवंत प्रेतें
दुष्काळानें देश गांजला,
इकडे सुचती सण आम्हांला;
पोळीसाठीं करुनी घाई, म्हणतों आला दसरा;
जिथें दैन्य थैमान घालितें तिथें कशाचा दसरा ?

३

सदा वागतों आम्ही सारे
जणूं खुराड्यांतील कबुतरें;
ओलांडाया घरची सीमा
जिथें होतसे धीर न आम्हां;
कशास असल्या बावळटांनीं
रुमाल पगड्या सरसावोनी
रस्तोरस्तीं मिरवित जावें;
सीमोल्लंघन तया म्हणावें ?

असें शिलंगण करितों आम्ही म्हणतों आला दसरा;
जिथें दैन्य थैमान घालितें तिथें कशाचा दसरा ?

४

पूर्वकालिंच्या गेल्या तोफा,
आज तोंडच्या उरल्या वाफा
बंदुक काढी फुसका बार,
ऐकुनि धडधड करितो ऊर
चकचकते बोथट तरवार,
खुरप्यालागी तीह्नुनि धार;
अशी अवकळा घेउनि संगें
शिलंगणाचीं करितों सोंगें
या सोंगांची वरात काढुनि म्हणतों आला दसरा;
जिथें दैन्य थैमान घालितें तिथें कशाचा दसरा ?

५

ऐशा रीतीं सजे आमुची
स्वारी सोनें लुटावयाची;
भंवतालींचीं भणंग शेतें
करपहि ज्यांवरि पुरती नसते,
त्या करपीवर चढवुनि हल्ला
पाचोळ्याचा मारुनि कवळा

म्हणतों आम्हीं लुटिलें सोनें
तेंच वांटतों उत्साहानें
पाचोळ्याचें सोनें लुटुनी म्हणतों आला दसरा;
जिथें दैन्य थैमान घालितें तिथें कशाचा दसरा ?

६

भारतभूमी एका काळीं
सुवर्णभूमी म्हणुनि गाजली
दुर्दैवानें आज तियेला
अशी अमंगल आली वेळा,
म्हणुनि पूर्वींचें वैभव गेलें !
सोनें गेलें दसरे गेले
त्या दसऱ्यांच्या मंगल राती
दुबळ्या राष्ट्रांसाठीं नसती.
जोंवरी नाहीं 'तुमचे, तुम्ही' तोंवरि विसरा दसरा;
जिथें दैन्य थैमान घालितें तिथें कशाचा दसरा ?

**बुधगांव, १६।११।१९२३**

# ताई

## [ शार्दूलविक्रीडित ]

केव्हां कांहिंतरी घडोनि ह्रदयीं औदास्य जोरावतें,
ये वैताग, ‘ जगांत वासच नको ’ ऐसें मना वाटतें;
त्या वेळीं कुठुनी तरी हळुंच ये ‘ ताई ’ गुणी लाघवी,
पायाशीं लडिवाळ खेळुनि हंसे, आणी मला हांसवी. १

एखादे समयीं अकल्पितपणें उद्दिष्ट कांहींतरी
जातां सिद्धिस, चित्तवृत्ति दुरळे, होते क्षणीं हांसरी,
या ऐशा बहरांत गाळित टिपें ताई हळूं ये पुढें,
स्फुंदस्फुंदुनियां रडे, बघुनियां हें, जीव माझा कढे. २

एखादा सण येउनी निजसवें आनंद आणी घरा,
त्या वेळीं रुसुनी उगाच फुगुनी ताई धरी कोंपरा;
जेव्हां दुर्दिन खिन्नता पसरतो तो वस्तुमात्रावरी
ताई त्या दिवशीं प्रफुल्लवदनें पाडी प्रकाशा घरीं. ३

* * *

ताई, हें सगळें तुला सहज गे ! आम्हीच वेडे खरे,
पाहोनी असला विरोध, म्हणतों ‘ व्हावें असें कां बरें ? ’

बुधगांव, १८।१२।१९२३

# स्फुट अभंग

भेसळीचें नाणें । झणझण करी
जगाचे बाजारीं । मोल त्यासी. १
राष्ट्राचें कल्याण । बोले सभांतूनी
आंत स्वार्थखाणी । पुढारी तो. २
योगवासिष्ठाचें । मुखें पारायण,
विषयीं तल्लीन । तो विरक्त. ३
परम वैराग्य । दाविते आकृति
आंत पशुवृत्ति । तोचि साधू. ४
वरी बोलण्यासी । सोनियाचा रंग
दुष्ट अंतरंग । तो प्रेमळ. ५
वरी भाव दावी । आंत आग लावी
तयासी पदवी । स्वामिनिष्ठ. ६
काळ्या रंगावरी । सफेती फांसोनी
चाले भुलावणी । जगामाजी. ७

**बुधगांव,** १८।१।१९२५

# दोन चित्रें

[ संस्थानी राजधानीच्या शहरांत असलीं दृश्यें केव्हां केव्हां दिसतात. ]

असे घराच्या समोर अंगण खुलें तया भीतरीं,
स्वच्छंदानें बाळ एकला कांठीघोडा करी. १
गुंग होउनी चित्त तयाचें खेळावरती जडे,
किंमत नव्हती तया जगाची अपुल्या खेळापुढें. २
मार्गावरुनी मोटारींतुनि जाय गांवचा धनी,
राजपदाला शोभे ऐसा परीवार घेउनी. ३
मोटारीचा शब्द ऐकुनी बाळहि पाहे वरी,
कुतूहलानें हांसत राहे, नमस्कार ना करी. ४
धनी जाणता, मनीं उमगला निघुनि जाय हांसुनी
जातां जातां वळुनी वळुनी बाळा अवलोकुनी. ५

* * *

तेथुनियां मोटार झटकली आणिक कांहीं पुढें,
द्वारामाजी वृद्ध कुणितरी बघत उभा तिजकडे ६
सुकट चेहरा नजर विषारी किडक्या सापापरी
नाकावरती चष्मा, आठ्या विपुल कपाळावरी. ७
मोटारीचा शब्द ऐकुनी धांवत आला जरी,
' उगाच सहजीं आलों ' ऐसा वृद्ध बहाणा करी. ८
धनी पाहतां मंदस्मित परि तोंडावरि झळकलें,
यंत्रावाणी हात तयाचे जमिनीला लागले. ९
प्रणाम घेतां धनी हांसला मोटारही झटकली,
मग वृद्धाची स्वारी हर्षुनि घरामधें परतली. १०

* * *

चित्रें हीं बघतां दोन्ही झालों स्तंभित विस्मयें,
कोणतें मर्म यामाजीं जाणती रसिक स्वयें. ११

गुरुगेरी, ११।३।१९२६

## स्वयंसेवकास

[ स्वयंसेवकपथकांत नांव दाखल करणाऱ्या तरुणास उद्देशून खालील कविता लिहिली आहे. ]

( चालः— भूपती खरे ते० )

ऊठ तूं स्वयंसेवका स्फूर्तिनें ऊठ
स्थिति परी सभोंतालिची बघुनि घे नीट १
वेंधळेपणें कार्यास लागतां बा ! रे !
नासतें हातिचें कार्य अशानें सारें २
भोंवतीं तुला साहाय्य करायासाठीं
जरि दिसे दाटली सहाय्यकांची दाटी. ३
परि घाव घ्यावया तूंचि पुढें व्हायाचा
सरसाव पुढें मनिं विचार करूनी याचा. ४

जनसेवाव्रत हें असे दिसाया सोपें
मार्गांत संकटें परि उठतात उमापें ५
बेगुमान तुडवुनि जाइन एकेकाला
हा जोम् पाहिजे अंगीं आरंभाला. ६
एवढा आत्मविश्वास हवा तुजपाशीं
संकटीं उडी तूं घाल झुंज मग त्याशीं. ७
निस्वार्थ बुद्धिचे आणि अशा वृत्तीचे
जरि राष्ट्रहितास्तव झटतिल कायावाचें ८
तरि दूर नसे तो काळ देशभाग्याचा
नव उत्कर्षाचा आणी स्वातंत्र्याचा. ९

गुडगेरी, ११।५।१९२६

# परमेश्वरा !

( जाति – साकी )

छत्र कृपेचें तुझ्या सदोदित असतां माझ्यावरती,
शिवली नाहीं कधीं मनाला काळाचीही भीति. १
परिस्थितीचीं तीव्र बंधनें जाचक भंवतालींचीं
सांभाळोनी वाट काढितों आहे ध्येयाकडची. २
कुत्सितवृत्ती परोपरीनें देति दूषणें नाना
कशी रुचावी स्वातंत्र्याची वृत्ती नादानांनां. ३
सत्य परंतू कटु वचनांनीं कधिंकाळीं दुखलेले,
दंश करोनी सूड घ्यावया टवकारुनि बसलेले ४
वळवळ करिती पायीं असले कितीक किडके साप,
तुझ्या कृपेनें टांचेखालीं मरतिल आपोआप. ५
ध्येय ठेवुनी उज्ज्वल पुढती कर्तव्याला करणें,
सत्यपथानें जाणें याहुनि दुसरें कांहीं नेणें. ६
पर्वा नाहीं अमित संकटें रोधितील जरि काजा,
यशायशाची मज न काळजी तूंची तारक माझा. ७

चुषगांव, २७।७।१९२७

# जाईच्या फुलास

[ उकिरड्याजवळील जाईच्या वेलावर फुललेलें फूल केवळ उकिरड्याच्या सान्निध्यानें जगाच्या धिक्कारास पात्र होतें. ]

गोड जाइच्या फुला सदा मी जीव तुला वाहिला ॥ ध्रु० ॥
जरी उकिरड्यावरी
घाण पडे चौथरी
तया सन्निधीं परी
वेल जाइचा चढे तयावरि जन्म तुझा जाहला ॥ १ ॥
उपवनांत कितितरी
जाइ फुलें गोजिरीं
सदैव बघतों जरी
तुझ्या गुणांची गोड माधुरी लळा लाविते मला ॥ २ ॥
जाळाया तुजप्रती
वाहति तुजभोंवतीं
वात विषारी अती
केविलवाणी स्थिति ही माझ्या लोचनिं आणी जला ॥ ३ ॥

हीन जाति यामुळें
भंवतींचे जन खुळे
पतित तुला समजले
देखाव्यानें भुलुं दे त्यांना मी नाहीं त्यांतला ॥ ४ ॥
धुंडियलें किति जरी
न दिसे सौधावरी
नसे राजमंदिरीं
गरिब झोंपडीमाजी गवसे सद्‌गुण जगतांतला ॥ ५ ॥
तुझ्या गुणांच्या बळें
मन माझें ओढलें
तुजवरि तें गुंतलें
जें जडलें तें जडलें नाहीं अन्य मार्ग त्याजला ॥ ६ ॥
सुखवाया तुजप्रती
प्राणांची आहुति,
देइन मी संप्रती
पर्वा नाहीं जरी जगानें धिक्कारियलें मला
गोड जाइच्या फुला ! सदा हा जीव तुला वाहिला ॥ ७ ॥

बुधगांव, २१।८।१९२७

# प्रतिभा

( जाति – श्रीपती )

[ कलावंताच्या अंतःकरणांत प्रतिभा केव्हां व कशी स्फूर्त होते हें एक अगम्य गूढ आहे. ]

चमकली बिजलि, अंतरीं शिरली
घर तिथें करुनि राहिली ॥ ध्रु० ॥
आकाश पसरलें निळें
बहरलें ऊन्ह कोंवळें
उल्लसे वृत्ति त्यामुळें
मेघ नोहते अशा अकालीं परि बिजली चमकली ॥ १ ॥

मजसमोर कोणीतरी
स्वर्गांतिल उतरे परी
रोखुनी तिनें मजवरी
सहज सोडिला तीर ताणुनी भुवईची धनुकली ॥ २ ॥

क्षणमात्र तिथें चमकली
चमकतां गोड हांसली
अणि कुठें लुप्त जाहली
अजुनी नाहीं ठावें मज ती कोण आणि कोठली ॥ ३ ॥

वसतसे सदा अंतरीं
परि मधुनी केव्हांतरी
हृदयाच्या गगनावरी
तीच चंचला चमचम करिते जाशि तेव्हां चमकली. ॥ ४ ॥

बुधगांव, ९।१०।१९२७

## भगिनीप्रत

( जाति – साकी )

कुण्या जन्मिचा लागाबांधा म्हणुनी माझ्यासाठीं
मोलाचीं आसवें गाळिसी उगाच होउनि कष्टी ॥ १ ॥
इतिहासीं विख्यात असें त्या राजकुलामाझारी
जन्म जाहला तुझा आणि मी आहें एक भिकारी ॥ २ ॥
परिस्थितीचें अंतर इतुकें असुनी ठावें पुरतें
त्वां मजसंगें तदा जोडिलें प्रिय भगिनीचें नातें ॥ ३ ॥
निर्हेतुक तव लोभ निरंतर मजवरती आहे, ही
सुखद कल्पना उदास जीवा होत असे सुखदायी. ॥ ४ ॥
उदासवाणा पाहुनि मजला कष्टी होसी फार
काय करूं ? जग भासे मजला घोर निबिड कांतार ॥ ५ ॥

मधुर स्वप्नें पूर्वकालिंचीं जातां विरुनी सारीं
क्षणोक्षणीं मजलागि भासतें जीवन जड हें भारी. ॥ ६ ॥
रुक्ष 'सहारा' सभोंवताली मधें तापतो जीव
परिस्थितीची जाणिव घाली मर्मावरती घाव ॥ ७ ॥
ऐशापरिचें सुनें सुकें हें जीवन जगतीं नेणें
हेंच राहिलें आतां माझ्या आयुष्याचें लेणें ॥ ८ ॥
तडफड करितो जीव पाहतो तोडायाला पाश
परी रुपेरी बेडी घाली दृढ विळखा पायास ॥ ९ ॥
माझा मज लखलाभ असूं दे आयुष्पथ कांटेरी
माझ्यासाठीं नकोत अश्रू तव नयनामाझारीं ॥ १० ॥
सदा सुखाच्या राशीवरती बघुनी तुज रुळतांना
अंधारामधिं किरण सुखाचे दिसताती नयनांना. ॥ ११ ॥
तुझ्यावांचुनी अन्य न आतां जगीं सुखाचा ठेवा
एक मागणें, ताई! मजला नको विस्मरूं केव्हां. ॥ १२ ॥

गुडगेरी, ५।६।१९२८

# चित्रकार फकीर

[ शार्दूलविक्रीडित ]

बाल्यापासुनि पूर्ण नाद मजला वेळा कधीं साधुनी,
नाना रम्य चमत्कृती कुतुहलें देखावया हिंडणें.
रेघोट्या कसल्या तरी उठवुनी नानाकृती काढुनी
जें कांहीं नयनीं दिसें झणिं तया चित्रांत रेखाटणें. १

मूळाच्या जरि वस्तुशीं मुळिं नसे त्यांच्यांमधें साम्यता,
चित्रें बालिश तीं परी रिझवितीं माझ्या अडाणी मना.
काढावीं इतुकेंच ज्ञान मजला त्याच्यापुढें तत्त्वता
साम्यासाम्य बघावया न धजली माझी कधीं कल्पना. २

ऐसा छंद बळावला मज सुचे कांहीं न चित्राविणें,
अभ्यासें मम पूर्णशी शिरकली चित्रांमधें कल्पना.
हूबेहूब पदार्थ चित्रफलकीं काढोनियां ठेवणें
हाताचा मळ जाहला मजसि तें कांहींहि वाटेचना. ३

याच्याही पुढती मदीय प्रगती होतां क्रमानें पुढें
वस्तूवांचुनि कल्पनामय किती चित्रें निघूं लागलीं!
लागेना पुढती मला फलकही ना लक्ष रंगाकडे
एका स्फूर्तिबलावरी मज कला हस्तांकिता जाहली. ४

चित्रें काढित एकतान बनुनी जेव्हां निसर्गासवें
तैसें मी फलकाविना, नच करीं घेवोनियां कुंचली;
जीं त्या गोड समाधिकालिं गळतीं नेत्रांतुनि आंसवें
त्यांतूनी रमणीय मीं कितितरी चित्रें तदा निर्मिलीं. ५

लोकीं यापरि चित्रकार म्हणुनी विख्याति मी पावतां,
कीर्ती लोळण घे पदावरि तशी लाधे बहू संपदा.
दैवानें परि वक्रदृष्टि करुनी माझ्यावरी पाहतां,
क्रांतीची विपरीत गोष्ट घडुनी ती हाय! ये एकदां. ६

होती रम्य सकाळ चित्रफलका घेवोनियां संगतीं
मोदें पाहत सृष्टिरूप फिरलों मी आंबराईतुनी
कुंजाआड विचारमग्न युवती कोणी मनोज्ञा अती
एकाकी बसली दिसे निजकरीं पुष्पांप्रती घेउनी. ७

थोडी चाहुल लागतां बिचकुनी जाईल हें जाणुनी
टाकोनी पद मंद मी विलगलों कुंजास कैसातरी
पाहोनी विधिची कृती अनुपमा ती निर्मला तेथुनी
झाले लोचन धन्य पूर्ण ठसली मूर्ती तिची अंतरीं. ८

स्वर्गींची चुकुनी परी अवतरे कां आज पृथ्वीवरी
मेघांचा पथ सोडुनी जगतिं ये कां आज विद्युल्लता !
होतों चिंतित ना कळे तिज कशी चाहूल लागे परी
गेली दृष्टिपथांतुनी झडकरी ती पाहतां पाहतां. ९

गेली दृष्टितुनी परी ठसुनि जी राहे मदीयांतरीं
मूर्ती ती फलकावरी चितरण्या औत्सुक्य भारी मनीं
होता जो अभिमान तज्ज्ञ म्हणुनी तो दाटतां अंतरीं,
रेखाया सरसावलों फलक मी माझ्यापुढें घेउनी. १०

मूर्ती सुंदर चिंतितां मन तदा अत्यंत उल्हासलें
गेलों गुंगत त्यामध्यें न कळतां लागे समाधी पुरी.
केव्हां गोड समाधिमाजि फलकीं मीं चित्र रेखाटलें
केव्हां रंग कुठें दिला न कळलें माझें मलाही परी. ११

जातां काळ समाधिचा उघडुनी सोत्कंठ नेत्रांप्रती
आशेनें फलकावरील उठल्या चित्राकडे पाहिलें,
तों तेथें विपरीत चित्र बघुनी हो गुंग माझी मती
झालें हें भलतेंच केंवि, पुरतें माझें मला नाकळे. १२

जाईच्या सुमनापरी मृदुल ती मूर्ती कुठें गोजिरी
जीच्या रम्य मुखावरी बहरल्या स्वर्गीय सद्भावना
रेखावी म्हणतां तियेस फलकीं ये कोठली दूसरी
झालें हें उलटें बघूनि हृदया झाल्या अती यातना. १३

सारीं चित्रकला प्रयत्न करुनी अभ्यासिली मीं वृथा
झाली कीर्ति उगाच लेश नसतां मी पात्र त्या कीर्तिला,
ये वैताग असा बघूनि फलकीं ये चित्र तें अन्यथा
रागानें भिरकावुनी फलक तो मीं दूर तेव्हां दिला. १४

नाहीं यापुढती कधीं बुडविणें रंगामधें कुंचला
केला निश्चय यापुढें न कधिंही चित्रास रेखाटणें,
तेव्हांपासुनि जीवनीं चहुंकडे अंधार भासे मला
वैतागूनि जगा फकीर बनुनी मी कंठिताहें जिणें. १५

गुडगेरी, ७।६।१९२८

# स्फूर्तिदेवतेस

( जाति – दोहा )

आळसलेले जे कोणी, असतिल भारतवासी
झिंगुनियां झोपेंत सदा विसरति उद्योगासी
आयुष्याचें मोल किती कधीं न कळलें ज्यांना
कर्तव्या प्रवृत्त करी, तूं निजल्या जीवांना. १

लाखमाप संपत्ति सदा खेळे ज्यांच्या हातीं
उधळाया उद्युक्त तिला परि जे चैनीसाठीं
राष्ट्राचें कल्याण मनीं आणुनि त्यांतिल कांहीं
वेंचायाची स्फूर्ति सदा स्फुरवी त्यांच्या हृदयीं. २

वित्त, शास्त्र, व्यापार, कला या सकलामाझारीं
दौडीनें भरधांव पुढें गेलीं राष्ट्रें सारीं
कळलें तरिही जे करिती अजुनी डोळेझांक
ऐकवि त्या दुबळ्यांस तुझी चेतविणारी हांक. ३

अन्यायें देतांच कुणीं थप्पड एका गालीं
गाल दुजा द्यायास पुढें ज्यांची नित्य तयारी
असले जे असतील कुणी मेलेल्या नाडीचे
तत्त्व तया पटवीं देवी ! " ठोशाला ठोशाचें ". ४

स्फूर्तीचा संदेश तुझा दिगंत फैलावूंदे
त्यायोगें अणुरेणूंना नवस्फुरण येऊंदे
खेळूंदे राष्ट्रांत नव्या जागृतिचें चैतन्य
उत्कर्षानें होऊंदे राष्ट्र आमुचें धन्य ! ५

**गुलबर्गा**, ३।१०।१९२८

# हताश तरुणास

[ ध्येयाचें अत्युच्च शिखर गाठतांना अनेक दुर्धर संकटांना तोंड द्यावें लागतें. ]

ठेंच लागली जरा तियेनें होसि किती घाबरा ॥ ध्रु० ॥
तें पहा पर्वतावरचें
उत्तुंग शिखर ध्येयाचें
तुज असे तिथें जायाचें
तूं अजुनी कुठच्या कुठें म्हणोनी करि नेटानें त्वरा ॥ १ ॥
सुरवात प्रवासा झाली
तोंवरी क्षीणता आली,
जाणार कसा मग शिखरीं ?
या सखल प्रदेशावरी घुटमळूं नको क्षणहि तूं जरा ॥ २ ॥
हा माळ संपतो जेथें
तुज चढण लागतें तेथें
वरि बघतां भोंवळ येते
जरि हिंमत धरुनी चढुनी जाशी तरिच मर्द तूं खरा. ॥ ३ ॥

कांटेरी झुडुपांमधुनी
तव मार्ग चढे वळणांनीं
भरलासे तो कांट्यांनीं
जरि ओरखड्यांनीं रक्तें निघतिल होउं नको घाबरा ॥ ४ ॥
सांडल्याविना रक्ताला
उन्नतीस कोणि न गेला
ठसवुनि घे हें हृदयाला
संकटांसि तुडवुनि शिखर गाठणें भूषण हें जगिं नरा ॥ ५ ॥
वरि जातां थोडें दूर
दिसतील दऱ्या भेसूर
ज्यांमधें श्वापदें क्रूर
आरोळ्या ज्यांच्या ऐकुनि अंगा घाम सुटे दरदरा ॥ ६ ॥
मार्गावरि विघ्नें असलीं
भिववितील तुज मोठालीं
बेगुमान तुडवुनि सारीं
जायाचें तुजला; भ्याडपणा मग कवटाळिसि कां उरा ? ॥
ठेंच लागली जरा तियेनें होसि किती घाबरा ! ॥ ७ ॥

**बुधगांव, १७।११।१९२८**

# सदानंद

( जाति — मोहिनी )

पश्चिमेस बुधगांवाच्या वाट एक जाते
विस्तरलीं दो बाजूंना जिच्या रुक्ष शेतें
मधुनि मधुनि निवडुंगाचे उंचसे डवंगे
डोलतात शेताकांठीं वायुचिया संगें १

पाहतांच त्यांतिल एका डवंग्यास हाय !
दाटतात अश्रू नयनीं हृदय विकल होय.
त्या तळींच कांट्याखालीं दगड ढेकळांत
' सदानंद ' निजला माझा काळझोंप घेत. २

दोन मास नाहीं पुरता राहिला जगांत
' सदानंद ' नामें होई तेवढ्यांत ख्यात
गोड बाललीला त्याच्या बघुनियां मनाला
जन्मजात नैराश्याचा अल्प विसर झाला. ३

सदानंद आनंदाचा गर्भ मला ठेवा
क्रूर हेतु अदृष्टाचा परि कसा कळावा ?
ये *विसर्प व्याधी न्याया काळदूत त्याला
सदानंद माझा त्यानें हाय ! हिरुनि नेला. ४
काळरात्र आजहि मजला हाय ! आठवे ती
खिन्नवदन बसलों होतों त्याचिया सभोंतीं
झांपडिनें मिटले डोळे श्वास क्षीण चाले
तयावरी खिळले अमुचे अश्रुपूर्ण डोळे. ५
एकदोन अचके बसले क्षीण शरीराला
विझुनि जाय प्राणज्योती बाळ थंड झाला
हंबरडा फोडी माता आठवूनि चाळे
आणि तिच्या मांडीवरती प्रेत हाय ! लोळे. ६
ओढियलें मृत देहाला मीं कठोर हातें
शोकभरें नयनांतूनी अश्रुपूर लोटे.
परि कठोर दगडाहूनी करुनियां मनासी
गुंडाळुनि वसनीं बाळा धरियलें उरासी. ७
रात्र गाढ अंधाराची पसरली भयाण,
काळरात्रि ऐशा नेला बाळ घरांतून
मार्ग शून्य होता, नाहीं भेटलें कुणीही
घुबड मात्र घूत्कारानें मधुनि हांक देई. ८

---

* विसर्पः— धांवरें नांवाचा रोग.

गांववेस ओलांडूनी तीन बाभळींचें
शेत येइ गेलों कांहीं दूर आंत त्याचे
खांच एक खणुनी तेथें दगडढेकळांत
सदानंद जड हातांनीं ठेविला तियेंत. ९

लोटितांच बाळावरती दगड आणि माती
किती आग भडके हृदयीं नको कल्पना ती.
शून्य हृदय झालें जेव्हां परतलों घरास
मृत्तिकेस अर्पुनि माझ्या गोड बालकास. १०

हाय ! मला स्मरती त्याचे सदा गोड चाळे
आठवतां अश्रूधारा वर्षतात डोळे
बहुत काळ गेला तरिही जखम अंतरींची
आजवरी नाहीं बुजली कधि न बुजायाची. ११

अजुनि कधींकाळीं जातां सहज त्या पथानें
स्मरण येइ मानस जातें भरुनि खिन्नतेनें.
दोन अश्रु गळती आणी वदत मी मनांत
सदानंद निजला येथें काळझोंप घेत. १२

बुधगांव, ११।५।१९२९

# हरिणीप्रत

[ एकदां माळावर फिरावयास गेलों असतां समोर हिरवळीवर संथपणें चरणारी एक हरिणी, मला पाहतांच मला शिकारी समजून पळूं लागली; त्या हरिणीस उद्देशून प्रस्तुत कविता लिहिली आहे. ]

( चालः- खरा तो प्रेमा० सारखी )

भिउं नको वेडे ! मी नाहीं क्रूर शिकारी ॥ ध्रु० ॥
या जगताच्या दांभिकतेला
आणी स्वार्थी बाजाराला
आहें पुरता मी विटलेला
विरंगुळा घ्यायास जिवाला पडलों क्षण बाहेरी. ॥ भिउं॥ १

चुरडुनि जातीं गरिबें दुबळीं
तोंडपुज्यांची पिकते पोळी
बघतां उठते तिडिक कपाळीं
ती शमवाया मैदानीं या सहज टाकिली फेरी. ॥ भिउं ॥ २

मैदानावरची ही हिरवळ
अहा ! पसरली हिरवी मखमल
शोभे वरि तव आकृति प्रेमळ
बघुनि दृश्य हें उदासीनता मावळली मम सारी. ॥भिउं॥ ३

गोड बालिका तूं सृष्टीची
मूर्ती सात्विक सौंदर्याची
आणी निर्मळ स्वैरपणाची
दृष्टी वळते परी जगाची तुजवरिं हाय ! विषारी. ॥ भिउं ॥ ४

आमुच्यांतले हौशी कांहीं
जातीचे शेंदाडशिपाई
गरिबांचे बनतात कसाई
आणि "शिकारी आम्ही" म्हणुनी मिरविति शेखी भारी. ॥ भिउं ॥ ५

असेल हिंमत तरि असल्यांनीं
गर्द जंगलांमधें घुसोनी
वाघावरती झडप घालुनी
लोळवुनी त्या सार्थ करावें जगांत नाम शिकारी. ॥ भिउं ॥ ६

असें करावें धाडस कांहीं
हिंमत तितुकी अंगीं नाहीं
परी नेभळ्या हौसेपायीं
दुबळ्यावरती घाव घालिती असले पंचहत्यारी. ॥ भिउं ॥ ७

पदोपदीं अनुभव असल्यांचा
म्हणुनि अंतरीं तुझ्या सदाचा
ये तिटकारा मानवतेचा
भीतीनें सजलीस पळाया मी दिसतांच समोरीं. ॥ भिउं ॥ ८

विश्वप्रेमी माझी वृत्ती
हृदयीं बाणे निसर्गप्रीती
लवही शंका न धरीं चित्तीं
मैदानीं या खुल्या दिलानें तूं हो बागडणारी. ॥ भिउं ॥ ९

तुला पाहतां निसर्गबाळे !
वात्सल्याचें भरतें आलें
जवळीं माझ्या ये लडिवाळे !
कुरवाळूं दे तोंवरि पाउल टाकुं नको माघारी
भिउं नको वेडे ! मी नाहीं क्रूर शिकारी ॥ ध्रु० ॥ १०

बुधगांव, २१।५।१९२९

# गोड कविता

[ मधुकर मासिकाचे वर्षारंभाचे अंकासाठीं संपादकांनीं गोड **कविता** **मागितल्यावरून** खालील कविता पाठविली होती. ]

( चालः— पांडवा सम्राट् पदाला० )

पाहतां चोहींकडे ही ऐक्यहोळी पेटली
स्वस्थता चित्तास नाहीं गोड कविता कोठली? ॥ ध्रु० ॥

१

संकटें नानापरीचीं उन्नतीमार्गावरी
राहुनी राष्ट्रासमोरी दाविती भीती पुरी
भिन्न भाषा भिन्न जाती भिन्न रीती यांमुळें
आमुच्या या हिंदभूचें ऐक्य सारें भंगलें
माजलें जें द्वैत त्यानें हिंदभूमी गांजली
स्वस्थता चित्तास नाहीं गोड कविता कोठली?

२

हिंदभूच्या संस्कृतीची आणि धर्माची ध्वजा
फडकली आणि तियेनें धन्य केलें पूर्वजां
विस्मृती आम्हां तियेची हाय! झाली आजला
अंतरंगा कीड लागे मात्र भपका माजला
संस्कृतीचा ऱ्हास झाला धर्मतत्त्वें लोपलीं
स्वस्थता चित्तास नाहीं गोड कविता कोठली ?

३

आपुलें जें तें निकामी कीं विदेशी चांगलें
कल्पनेनें या अभागी राष्ट्र हें भांबावलें
कोटिमापें वित्त जातें अन्य देशीं आमुचें
आणि दारिद्र्यांत मरणें हाय! आम्हांला रुचे
स्वाभिमाना चूड लागे राष्ट्रभक्ती लोपंली
स्वस्थता चित्तास नाहीं गोड कविता कोठली ?

४

शिंपिले समरीं जयांनीं नित्य रक्ताचे सडे
वीर्यशाली वज्रदेही वीर ते कोणीकडे ?
भ्याड झालों आज आम्ही हिंदभूचीं लेंकरें
संकटाचें नांव आम्हां ऐकतां धडकी भरे
वीर्य गेलें, शौर्य गेलें, भीरुता बोकाळली
स्वस्थता चित्तास नाहीं गोड कविता कोठली ?

५

आगलावे, धर्मवेडे चेतवीती भांडणें
प्रत्यहीं निकरास येती पक्षभेदाचीं रणें.
लोपली कर्तव्यनिष्ठा माजली वाचाळता
जाहिराती देशभक्ती भूल पाडी भारता.
मायदेशा जोंवरी ही गांजिते दुरितावली
स्वस्थता चित्तास नाहीं गोड कविता कोठली !

कुंदगोळ, २३।९।१९२९

# उंबरांतले किडे

**[ उंबरांतल्या किड्यांना आपलें उंबर म्हणजेच सारें जग असें वाटत असतें. अफाट विश्वाची कल्पना त्या दुबळ्यांना कोठून असणार ! ]**

( जाति – **पद्मिनी** )

उंबरांत बांधुनि वाडे उंबरीं नांदती किडे ॥ ध्रु० ॥

राजा झाला कुणी एकला
दुजा गाजवी प्रधानकीला
तिसरा जागे रखवालीला
प्रजा बनोनी अंवतेंभंवतें असंख्य जमले किडे. ॥ १ ॥

त्यांतच होते वाणी उदमी
वैद्य आणखी वकील नामी
बाह्य जगाला परी निकामी
तिथेंच जगती तिथेंच मरती क्रम हा ऐसा घडे. ॥ २ ॥

कूपांमाजीं बेडुक वसती
त्या कूपाला विश्व मानिती
या कीटांची असली वृत्ती
अफाट भंवतीं विश्व पसरलें नच बघती त्याकडे. ॥ ३ ॥

किति शतकांच्या जुन्या कल्पना
धार्मिकतेच्या फोल वल्गना
हीच जयांची धर्मभावना
असे धर्ममार्तंड उंबरीं कितितरि होते बडे. ॥ ४ ॥

खाण्यासाठीं जन्मा यावें
खातां खातां मरुनी जावें
तत्त्व पाळिती जीवेंभावें
फुकट खाउनी राष्ट्रें बुडती नुमजति परि बापुडे. ॥ ५ ॥

‘ राजा विष्णूचा अवतार ’
या तत्त्वाची महती फार
किडे घोकिती वारंवार
आणि उंबरी राजवटीचे वाजविती चौघडे. ॥ ६ ॥

लाथेसरशीं उंबर उडतें
सहजीं पायीं चुरडुनि जातें
विश्व त्यांतलें क्षणांत मरतें
तरी उंबरा विश्व समजती अज्ञानी बापुडे. ॥ ७ ॥

प्रगतीमार्गावरि जग धांवें
म्हणुनि जगाच्या मागें जावें
जगतासंगें नवें बनावें
प्रगतितत्त्व हें या हतभागी मूर्खांना वावडें. ॥ ८ ॥

असें विश्व हें ज्यांचें त्यांना
उंबरांतल्या घुंघुरव्यांना
असो सदा लखलाभ किड्यांना,
अशा विचारें तुच्छत्वें जग हंसे बघुनि यांकडे
उंबरांत बांधुनि वाडे उंबरीं नांदती किडे. ॥ ९ ॥

खंडाळी, २२।११।१९२९

## इषारा

बघुं नको खुळे! मजकडे अशी तूं या भलत्या नजरेनें ॥ ध्रु० ॥

अशी वांकडी नजर तुझी ही
प्रिय भगिनीला शोभत नाहीं
विचार याचा करिं तूं कांहीं
तुजविषयीं मानस तुडुंब भरलें मम भगिनिप्रेमानें. ॥ १ ॥

प्रथम तुझा मज परिचय घडला
कंटाळा तोंवरी जिवाला
या जगताचा होता आला,
परि तव सहवासें प्रकाशलें मम जीवित चैतन्यानें. ॥ २ ॥

मीं त्या उज्ज्वल क्षणापासुनी
सदा मानिलें तुजला भगिनी
सदा सुखी तूं व्हावें म्हणुनी
प्राणही प्रसंगीं अर्पायाला झटलों तत्परतेनें. ॥ ३ ॥

मजला नव्हती मुळीं कल्पना
कीं असली भलतीच भावना
करील चंचल कधीं तव मना
बेभान मात्र तूं उगाच झालिस वेड्या उन्मादानें. ॥ ४ ॥

सद्भावाचा सिंधू भरला
त्यांत विषारी बिंदू असला
न कळुनि वेडे! तुवां टाकिला
हा घाव लागुनी मर्मी मानस भरलें औदास्यानें. ॥ ५ ॥

असेंच व्हावें विधिघटना ही
दोष यांत तव तिळही नाहीं
म्हणुनी कष्टी मुळीं न होई
प्रिय बंधु तुझा मी, सदा मजवरी बघ या सद्भावानें
बघुं नको खुळे! मजकडे अशी तूं या भलत्या नजरेनें. ॥ ६ ॥

खंडाळी, २५।११।१९२९

# पाळीव पोपटास

[ एक पाळलेला पोपट पिंजऱ्यांत कोंडलेला असून मालकानें डाळिंबाचे दाणे त्यास खाण्यासाठीं पिंजऱ्यांतच त्याचेपुढें ठेविले आहेत, या कल्पनेवर प्रस्तुत कविता लिहिली आहे. ]

( चालः—सबसे रामभजन० सारखी )

हे डाळिंबाचे दाणे वेड्या ! घात तुझा करिती ॥ ध्रु० ॥
कवटी तूं कवठावरली
फोडिलीस एका काळीं
ती चोंच आज बोथटली
करितोस गुजारा धनी टाकितो त्या तुकड्यांवरती. ॥ १ ॥
मालक तव हौशी फार
करि माया जरि अनिवार
कुरवाळी वारंवार,
तूं "पाळिव पोपट" त्याचा म्हणुनी तुच्छ तुला गणिती. ॥२॥

चैनींत घेत गिरक्यांसी
स्वच्छंदें वनिं फिरलासी
गगनांत स्वैर उडलासी
ते स्वातंत्र्याचे दिन सोन्याचे आठव तूं चित्तीं. ॥ ३ ॥

चाहिल तें झाड बघावें
त्यावरी स्वैर उतरावें
फळ दिसेल तें फोडावें
मग उडुनी जावें खुशाल असली तेव्हांची रीती. ॥ ४ ॥

कितितरी फळें पाडाचीं
चोंचीनें फोडायाचीं
ही लीला तव नित्याची
पिंजऱ्यांत अडकुनि आयुष्याची झाली तव माती. ॥ ५ ॥

पूर्वींची हिंमत गेली
स्वत्वाची ओळख नुरली
नादान वृत्ति तव झाली
करितोस धन्याची ‘ हांजी हांजी ’ तूं पोटासाठीं. ॥ ६ ॥

येतांच धनी नाचावें
नाचत त्या सत्कारावें
तो वदेल तें बोलावें
तेव्हांच टाकितो मालक दाणे असले तुजपुढती. ॥ ७ ॥

हे दाणे दिसती छान
जरि लाल आणि रसपूर्ण
त्याज्य ते विषासम जाण
पिंजऱ्यांत मिळती म्हणुनि तयांची मुळिं नाहीं महती. ॥ ८ ॥

हा अधःपात तव झाला
डाळिंबचि कारण याला
भुलुनियां अशा तुकड्यांला
पिंजऱ्यांत मेले किति अभागी पोपट या जगतीं
हे डाळिंबाचे दाणे वेड्या ! घात तुझा करिती. ॥ ९ ॥

खंडाळी, २६।११।२९

# मंजुळा

विस्तीर्ण वडाच्या दगडी पारावरी,
मी बसें एकदां चिंतित कांहींतरी.
कितितरी वडाच्या पारंब्या लोंबती
या पारंब्यांची दाटी झाली किती. १

मंजुळा पोरगी कुणबी जातींतली,
बांध्यानें नीटस आणि काळिसांवळी.
वय तिचें असावें तेरा चवदा तरी,
ती पारंबीच्या खेळे झोल्यावरी. २

जरतारी पातळ नव्हती ती नेसली,
नोहता फुलांचा गजरा वेणीवरी.
वर्णही नोहता जरी केतकीपरी,
निर्व्याज खुलेपण हीच तिची माधुरी. ३

चरणीला लावुनि पांचचार शेरडें,
ती मधुनी मधुनी पाही त्यांच्याकडे.
गुणगुणे खेडवळ गाणें कांहींतरी
घे खुशाल झोंके हलत्या झोल्यावरी. ४

तिज माहित नव्हते शहरांतिल चोजले
    लाजणें मुरडणें असेल मग कोठलें?
मीं नांव तियेचें पुसिलें जेव्हां तिला
    खणखणीत सांगे "मज म्हणती मंजुळा". ५

मग विचारिलें मीं "तुम्हि भांवडें किती"?
    ती झटकन् सांगे "मी आणी श्रीपती.
शेतांत श्रीपती गेला राखायला
    आणिलीं शेरडें मीं हीं चारायला". ६

बोलुनी एवढें झोके चढवायला
    नेटानें लागे भान नुरे मग तिला
ती खुल्या दिलानें झोंके घे मंजुळा
    सानंद कौतुकें बघत उभा मी तिला. ७

तिज काय वाटलें न कळे परि थांबली
    निमिषांत उतरली झोल्यावरुनी तळीं
क्षणभरी मजकडे निर्हेतुक पाहुनी
    मंजुळा पळाली क्षणार्धांत तेथुनी. ८

मजपुढुनी गेली भरकन् वाऱ्यापरी
    शेरडांत मिसळूनि जाई निघुनी दुरी
त्या खुलेपणांतिल आठवीत माधुरी
    मी कितीवेळ तरि बसलों पारावरी. ९

ती निर्भय वृत्ती निर्हेतुक पाहणें
ते गोड खुलेपण अमुच्यामध्यें उणें.
येतसे स्वत चें कृत्रिम जीवित मनीं
कष्टलों परतलों घरास मग तेथुनी. १०

* * *

ह्या प्रसंग घडुनी किति वर्षें लोटलीं
भंवतालीं सारी कृत्रिमता माजली
परि मधुनी मधुनी आठवते ती मला
खेड्यांतिल साधी आणि गोड मंजुळा. ११

खंडाळी, २७।११।१९२९

# उपदेश करणारास

[ कुत्सित बुद्धीनें दुसऱ्याला उपदेश करणारांचा जगांत सुळसुळाट आहे, अशा वर्गाला उद्देशून खालील कविता लिहिली आहे. ]

( जाति – अंजनी )

कीटका ! नको तुझा उपदेश
माझें मजला कळतें सारें मग कां तव आक्रोश ? ॥ कीटका० ॥ १ ॥
कोण आणखी कसा असें मी
उपयोगी वा साफ निकामी
धर्मनिष्ठ वा पुरा अधर्मी
ठरवितील हें सहजी सारें काळ आणखी देश. ॥ कीटका० ॥ २ ॥
शिक्षण लौकिक व्यवहाराचें
जबरीनें जगता बायाचें
बांधिलेंस कां कंकण याचें ?
उठाठेव मग फुकट जगाची कां करितोस हमेश ? ॥ कीटका० ॥ ३ ॥
धर्मद्रोही मजला म्हणसी
धार्मिकतेचा टेंभा मिरविसि
परि सैतानापरी वागसी
आणि घालिसी तूं गरिबांच्या मानेभंवतीं पाश. ॥ कीटका० ॥ ४ ॥

सुशिक्षितांचा प्रागतिकांचा
नव्या मताचा नव्या मनूचा
अट्टल तूं दुष्मान सदाचा
श्वानासम भुंकणें जगावरि हाच तुझा आवेश. ॥ कीटका० ॥ ५ ॥
तोंडपुजेचा धंदा करिसी
परी धन्याला मागें निंदिसि
स्वामिनिष्ठ हो मजला म्हणसी,
किती प्रभूवरि निष्ठा माझी जाणे तो जगदीश. ॥ कीटका० ॥ ६ ॥
म्हणुनि सांगतों तुला बजावुनि,
खुशाल निंदा करि रात्रंदिनिं
उपदेशाचा आव न आणी
दावावें लागेल जगाला तूं पुरता बदमाष !
कीटका नको तुझा उपदेश. ॥ ७ ॥

खंडाळी, २८।११।१९२९

## जगाचा न्याय

( राग – मांड )

ह्या न्याय असे जगताचा ॥ ध्रु० ॥
रात्रंदिन ज्यांनीं भ्यावें
पदतळीं चुरडुनी जावें
त्यांच्याच कपाळीं यावे
उन्मत्त, करुनि अन्याय, उरावरि खुशाल नाचायाचा. ॥ १ ॥
मार्गावरि ठायीं ठायीं
हिंडतात गोगलगाई
जग तुडवी त्यांना पायीं
परि नाग विषारी फणा काढुनी डौलानें जायाचा. ॥ २ ॥
चिमकुलीं पांखरें सारीं
पारवळें गरीब बिचारीं
गांजिती तयांस शिकारी
बेगुमान बहिरी फिरे लुटारू तो गगनप्रान्तींचा. ॥ ३ ॥

मेंढरें, वासरें, गाई
कुणि त्राता ज्यांना नाहीं
कापिती अशांस कसाई
जंगलांत घुसुनी कुणि उतरीना नक्षा वनराजाचा. ॥ ४ ॥
भिजुनिया चिंब घामानें
खपुनि जे पिकविति रानें
ते मरती करभारानें
अत्तरी दिवे जाळितो छोकरा ऐदी श्रीमंताचा. ॥ ५ ॥
किति मजूर गिरणीमधले
राबतां राबतां मेले
तळमळतीं त्यांचीं पोरें
मोटारी उडवित फिरे मिजासी परि मालक गिरणीचा. ॥ ६ ॥
तोऱ्यांत बलिष्ठ असावे
गरिबांनीं फुकट मरावें
मत्तांनीं त्यां तुडवावें
मामला चालला असाच मागें; पुढतीं चालायाचा
हा न्याय असे जगताचा. ॥ ७ ॥

खंडाळी, २७।२।१९३०

# राजकन्या हिंदिया

[ सन १९२९ च्या एप्रिल-मेच्या सुमारास बच्चा-इ-साकू यानें अफगाणिस्थानांत बंडाळी करून गादी बळकावली. राजे अमानुल्ला पदभ्रष्ट होऊन त्यांना देशत्याग करावा लागला. मे महिन्याच्या अखेरीस राजे अमानुल्ला परिवारासह मुंबईस आले. तेथें अमानुल्लाची राणी सूरिया प्रसूत होऊन तिला कन्या जाहली. हिंदुस्थानांत जन्मास आलेल्या या राजकन्येचें नांव अमानुल्लानें ‘ हिंदिया ’ ठेविलें. जूनचे शेवटचे आठवड्यांत अमानुल्ला मुंबईहून इटलीकडे रवाना जाहले. या कथासूत्रावर प्रस्तुत कविता लिहिलेली आहे. ]

( जाति :— साकी )

एकाकाळीं अफगाणांचा सत्ताधारी राजा
स्वतंत्रता देवीचा होता जो जीवाचा कलिजा, ॥ १ ॥

बर्फाच्छादित नगशिखरांनीं रक्षित सुंदर जागीं
काबुलच्या प्रासादीं रमला परि तो आज अभागी. ॥ २ ॥

स्वातंत्र्याचें निशाण शिरलें बंडखोर हातांत
बच्चासाकू बंडखोर परि अमीर होइ क्षणांत; ॥ ३ ॥

अमानउल्ला अमीर परि तो देशत्यागी झाला,
काळाचा वरवंटा ऐसा कितिकांवरती फिरला. ॥ ४ ॥
स्वदेश सोडुनि अमानउल्ला आला हिंदुस्थानीं
रमणीभूषण संगें आली अफगाणांची राणी; ॥ ५ ॥
अमीर झाला मुंबापुरिचा अल्पकाल रहिवासी
गोड ' हिंदिया ' परमेशानें कन्या दिधली त्यासी. ॥ ६ ॥
अफगाणांची कन्या आली भारतांत जन्माला
अपूर्व योगायोगें लाभे नांव ' हिंदिया ' तिजला. ॥ ७ ॥
अमानउल्ला जरी येथुनी जाई परदेशासी
स्मृती चिरंतन त्याची राहे जागृत भारतदेशीं. ॥ ८ ॥
काबुलचें सिंहासन तेथें अजुनी डळमळताहे
तळीं तयाच्या परि रक्ताचा पाट अखंडित वाहे; ॥ ९ ॥
बच्चासाकू चढला तोही रसातळाला गेला
अमीर नादिरशहा भूषवी अफगाणी तक्ताला. ॥ १० ॥
अमीर झाले कितीक असले होतिल आणी पुढती
वाऱ्यावरती कण वाळूचे काय थोडके उडती ? ॥ ११ ॥
तक्तावरती अमीर बैसो कोणीही अफगाण
ऐहिक सत्ता दोन दिसांची जाते सहज सरून. ॥ १२ ॥
गोड हिंदिये ! नांव तुझें परि तव जन्मापासोनी
झळकत राहिल भारतभूच्या इतिहासाच्या पानीं; ॥ १३ ॥

जन्म मिळावा तुला भारतीं ऐसें योजी ईश
तुझिया नामें पुन्हा जोडिले दुरावलेले देश. ॥ १४ ॥
भारतभूच्या उत्तरसीमाप्रान्ताला लागोनी
वायव्येला गगनभेदि जी असे पर्वतश्रेणी, ॥ १५ ॥
दोन्ही बाजूंकडे तियेच्या पुराणकाळामाजी
आर्यसंस्कृती नांदत होती सदैव वंद्य जगा जी. ॥ १६ ॥
उत्तरकालीं तिथें गाजली अफगाणांची सत्ता
आर्यसंस्कृती रेटित त्यांनीं लोटियली सीमान्ता; ॥ १७ ॥
तेव्हांपासुनि राष्ट्र जवळचें आम्हां परकें झालें
भाइबंद आमुचे परी ते क्रूर लुटारू ठरले. ॥ १८ ॥
“ खैबर ” घाटांतुनी लुटाया टोळधाड ये त्यांची
भारतभूमींतली संपदा जणुं त्यांच्या बापाची; ॥ १९ ॥
लूट मिळविली अगणित, करुनी कत्तल क्रूरपणानें
रक्तानें माखिलीं तयांनीं इतिहासाचीं पानें. ॥ २० ॥
आर्यावर्ती अंदाधुंदी पुढती माजत गेली
उलथापालथ राजवटींची कितीक वेळां झाली; ॥ २१ ॥
आपसांत माजुनी यादवी राष्ट्र लयाला गेलें
अफगाणांनीं हंसत पाहिलें संथपणानें सगळें. ॥ २२ ॥
बलाढ्य राष्ट्रें दोन जवळचीं फुटुनि वागतां ऐशीं
परवशता राक्षसी क्रमानें भारतवर्षा ग्रासी. ॥ २३ ॥

अनेक शतकें दुजाभाव जो सदैव वाढत गेला
तुझिया जन्में गोड हिंदिये ! जाई पार लयाला. ॥ २४ ॥
मंगलकालीं गोड ‘ हिंदिया ’ नांव देउनी तुजला
अमानउल्ला पिता तुझा जणुं भविष्यवाणी वदला; ॥ २५ ॥
“ कीं खांद्याला भिडवुनि खांदा तव जन्मापासोनी
भाऊ भाऊ म्हणुनि नांदतिल जगांत राष्ट्रें दोन्ही.” ॥ २६ ॥
सुखी असूंदे अमानउल्ला आणि सौरिया राणी
दुरावलेले देश जोडिले योगायोगें ज्यांनीं; ॥ २७ ॥
दैवबलानें घडे तयांना जरि परदेशीं वास
भविष्यकाळीं घटना कैसी हें ठावें कोणास ? ॥ २८ ॥
गोड हिंदिये ! राजकन्यके ! आशीर्वच मम घेईं
दीर्घायू होवोनि वैभवीं सदैव लोळत राहीं. ॥ २९ ॥
चंद्र सूर्य झळकतील तेजें जोंवरि अस्मानांत
नांव तुझें झळकेल जगाच्या तोंवरि इतिहासांत. ॥ ३० ॥

खंडाळी, २९।२।१९३०

# कृष्णेच्या पुलावरून

[ एका नवीनच बांधलेल्या कृष्णा नदीवरील पुलावर उभा राहिलों असतां मनांत आलेले विचार खालील कवितेंत ग्रथित केले आहेत. ]

( चाल :– भूपती खरे ते० यासारखी )

ही वरुनी वाहत आली कृष्णाबाई
ही अशीच येथुनि खालीं वाहत जाई. ॥ ध्रु० ॥

किति काळ अशी वाहते
किति संक्रमणें पाहते
उच्छेद किती ऐकते
हें अज्ञ मानवा कुणा ठाउकें नाहीं. ॥ ही० ॥ १ ॥

पूर्वीच्या काळांतलें
साम्राज्य भरभराटलें
हिंदुत्व इथें गाजलें
ऐकिले बिजयचौघडे हिनें तेव्हांही. ॥ ही० ॥ २ ॥

परि पुढें कलह माजला
लागली उतरती कळा
" हैदोस " इथें गाजला
पाहिली हिनें वैभवीं विजापुरशाही. ॥ ही० ॥ ३ ॥

साम्राज्यमदें माजले
परि शिवरायाच्या बळें
ते अविंधही लोळले
देखतां हिच्या गरजले मराठेभाई. ॥ ही० ॥ ४ ॥

हिंदवी स्वराज्यांतले
रणमर्द हिनें पाहिले
रिपुरक्तानें नाहले
न्हाणिलें तया वीरांस हिनें तेव्हांही. ॥ ही० ॥ ५ ॥

ब्राह्मणी राज्य जाहलें
विपरीत यादवीमुळें
शतकांत तेंहि लोपलें
हांसली विषादें तेव्हां कृष्णामाई. ॥ ही० ॥ ६ ॥

परकीय युरोपांतले
मग येथें फोंफावले
ऐश्वर्य तयांचें झुले
साम्राज्य इंग्रजी उभें आज बघते ही. ॥ ही० ॥ ७ ॥

तो काळ जुना बदलला
प्रगतिचा मनू पातला
सरसावे यांत्रिक कला
नच कौतुक वाटे हिला तयाचें कांहीं. ॥ ही० ॥ ८ ॥

हिजवरी भला थोरला
ह्य पूल नवा बांधिला
किति ऐटीनें उघडिला
तुच्छत्वें हांसत तयाकडे ही पाही. ॥ ही० ॥ ९ ॥

क्षणभंगुर सत्ताबलें
उन्माद चढे त्यामुळें
नाचतसूं आम्ही खुळे
बेगुमान परि ही अशीच वाहत राही. ॥ ही० ॥ १० ॥

किति साम्राज्यें उलथलीं
किति नवीं उभीं राहिलीं
स्थिति सर्व हिनें पाहिली
परि कधीं तिळ हिनें पर्वा केली नाहीं. ॥ ही० ॥ ११ ॥

अज्ञात अनंतांतुनी
ये मागुनि ही कोठुनी
वाहते तशी वाहुनी
अज्ञात अनंतामधें लीन ही होई;
ही अशीच येथुनि खालीं वाहत जाई. ॥ ही० ॥ १२ ॥

चंडाळी, २।७।१९३०

# मान्यांच्या मुलास

[ चाकूनें लेखणी करीत असतांना हाताचें बोट थोडेंसें कापलेलें पाहून भेदरलेल्या मुलास उद्देशून ही कविता लिहिली आहे. मथळ्यांतील माने हें आडनांव उदाहरण म्हणून घेतलें आहे. ]

( चालः– पोवाड्याची )

चाकुनें कापलें बोट निघालें रक्त बघोनी तुला
दरदरुनि घाम सूटला असा कां वद मान्यांच्या मुला !

१

भोंसले घाटगे तसे महाडिक वीर
थोरात सुरवशी चव्हाण रणझुंजार
सावंत शेळके पवार जाधव माने
अशि वंदू कितितरी शूर शूर अभिधानें.
ज्यांचिया यशाला इतिहासानें गावें
जीं नांवें ऐकुनि काळानें कांपावें;
तेजवंत वंशांत अशांच्या जन्म तुझा जाहला
तिळाएवढी जखम कांपवी तुज मान्यांच्या मुला !

२

नाजूक फुलासम कोमेजुनी जायाचें
हें कधीं नोहतें ब्रीद महाराष्ट्राचें
कधिं चणे मुरमुरे कधिं हुरडा फांकोनी
कधिंकधीं दिनभरी उपवासी राहोनी
ते भीमथडीच्या घोड्यावरचे स्वार
रणधीर मराठे घुसले अटकेपार.
कणखर होते पूर्वज मग ये नाजुकपण कां तुला ?
तिळाएवढी जखम कांपवी तुज मान्याच्या मुला !

३

उदगीर पानिपत रणतीर्थें विक्राळ
त्यांवरी शत्रुला गमले कर्दनकाळ
संगरीं झुंजले करुनि छातिचा कोट
तरवारबहाद्दर कडवे भालाईत
चिरुनियां शत्रुचे कंठनाळ समरांत
वाहविले त्यांनीं रिपुरक्ताचे पाट.
रंगपंचमी अशी खेळले, त्यांच्या वंशांतला
तिळाएवढी जखम कांपवी तुज मान्यांच्या मुला !

४

रणकाली तोफा सज्ज वासुनी जबडे
बेगुमान भिडले तया छातिचे निधडे

झेलुनी शिरावरी लोहगोलवर्षाव
शर्थीनें ज्यांनीं लढुनि राखिलें नांव
रणमर्द मराठे हिंमत होती त्यांची
प्रत्यक्ष कृतांता वेसण घालायाची.
त्या बीजाचा अंकुर असुनी माने वंशांतला
तिळाएवढी जखम कांपवी तुज मान्यांच्या मुला !

५

तव पूर्वज होते अफाट विक्रमशाली
नांदलें राष्ट्र हें म्हणुनि स्वराज्याखालीं;
तें शौर्यवीर्य लोपतां क्रमानें पुढती
स्वातंत्र्यसूर्य मावळे भारतावरती.
ठेवुनी स्मृती पूर्वींच्या शूर मर्दांची
काळोखी रजनी झुंजत कंठायाची.
आणिबाणिचा प्रसंग कसला राष्ट्रावरि पातला,
तिळाएवढी जखम कांपवी तुज मान्यांच्या मुला !

बुधगांव, २०।९।१९३०

# संध्याकाळीं

सोनेरी किरणें उधळुनि चोहींकडे
दिनराज निघोनी जाय पश्चिमेकडे;
शेताचीं कामें सारुनि रानांतलीं
माणसें गुरांसह परताया लागलीं. १
सर्वकाल यंत्रासमान ज्यांचें जिणें
त्यांमध्यें दिनभरी मिसळोनी वागणें,
वीट या क्रमाचा मज पुरता येउनी
बाहेर झटकलों गुमान गांवांतुनी. २
मज बाजाराची पेठ नको वाटली
खोट्याचा सौदा नित्य ठरे ज्या स्थळीं;
दृष्टिही वळेना नगरोद्यानाकडे
ज्यांमाजी भरली कृत्रिमता चहुंकडे. ३
बाहेरिल सृष्टी सुंदर आणी खुली
पसरली डोइवर निळीझार पोकळी,
वायूच्या लहरी तरंगती त्यांसवें
स्वच्छंदें उडती किति पक्षांचे थवे. ४

वाटेस दुतर्फा गार पिकें पसरलीं
शेतांत शाळुचीं ताटें कणसाळलीं,
जांभळा फुलोरा खुले हरभऱ्यावरी
बेफाट पिकानें कोठें लवल्या तुरी. ५

आसमंतभागीं सगळ्या शेतांवरी
गडगंज संपदा या वेळीं पसरली;
अति उदार ऐशा खुल्या निसर्गापुढें
तुलनेला टिकती काय धनिक बापुडे ! ६

हे तरंग उठले तया क्षणीं अंतरीं
कुंपणाकडेनें जातां मार्गावरी;
घोळका चालला पुढुनी गांवाकडे
कौतुकें वेधली दृष्टी मम त्याकडे. ७

ढोलांत चाललीं पुढें चार गायरें
दुडदुडति मागुनी दोन तीन वांसरें,
ओढाळ त्यांतलें इकडे तिकडे पळे
वाटेवरि उठते धूळ कुठें त्यामुळें. ८

मालीक तयांचा कुणब्याचा पोरगा
राखिली निसर्गें सुंदर ज्याची निगा,
एकल्या फाटक्या जरि कुडत्याचा धनी
किति पाणिदार तो शहरी पोरांहुनी. ९

तेजस्वी डोळे तरतरीत चेहरा
कुळवंत मराठा दिसे पोर तो खरा;
तत्क्षणीं मनाला पटलें त्या पाहुन
जात ही इमानी भारतास भूषण. १०

शाळेंतिल शिक्षण त्यास नसे यामुळें
मुरडितील नाकें कोणी शहरांतले;
परि संतोषी जी वृत्ति यास लाभली
भोगितीं काय तीं दुबळीं शहरांतलीं. ११

दुबळ्यास लुबाडुनि सभ्यपणा मिरविणें,
सर्वदा नीतिला पायतळीं तुडविणें,
हे सद्गुण मिळती जया शिक्षणांतुनी
तें खुशाल जावो जगांतुनी लोपुनी. १२

वाहवलों ऐशा विचारांत तोंवरी
गायरें वांसरें गेलीं निघुनी दुरी.
मज अंधाराची जाणवली चाहुल
परतुनी यावया वळवीलें पाउल. १३

रानांत पसरली उमाप जी संपदा
ती डोळेभरुनी पाहियली एकदां;
चाललों दृश्य तें घोळवीत मानसीं
मुळि कळलें नाहीं वाट ओसरे कशी. १४

खंडाळी, १९।११।१९३०

## त्यागदेवतेस

( राग – मिश्रखमाज )

तूंच देवते ! तारक होसी स्वार्थी मम जीवाला. ॥ ध्रु० ॥

जीवनयात्रा सुरू जाहली
प्रारंभींच्या मादक काळीं
तिळभर सत्ता हातीं आली
हुरळुनि गेलों; नाहक भुललों खोट्या सन्मानाला. ॥ तूंच ॥ १ ॥

पोटार्थी जन सभोंवतींचे
तोंडदेखलें बोलायाचे
केवळ पुतळे परि स्वार्थाचे
कळुनी येतां परिस्थिती ही जीव विटोनी गेला. ॥ तूंच ॥ २ ॥

स्वार्थाच्या पायावरि सगळी
उभारणी जगताची झाली
गोष्ट पुरी ही जीवा पटली,
वाजत होता जरी चहुंकडे त्यागाचा डांगोरा. ॥ तूंच ॥ ३ ॥

भयाण रात्रीच्या अंधारीं
बावरलेल्या खिन्न जगावरि
तेज फेंकुनी उज्ज्वल भारी
निस्वार्थी पुण्यात्मे तारे तारितात जगताला. ॥ तूंच ॥ ४ ॥

कर्मवीर यापरी भारतीं
सोडुनि पाणी स्वार्थावरती
राष्ट्रोद्धारासाठीं झटती
तूंहि देवते ! जीवन अपुलें वाहिलेंस राष्ट्राला. ॥ तूंच ॥ ५ ॥

गजान्तलक्ष्मी झुलते द्वारीं
देशास्तव लाथाडुनि सारी,
कष्ट भोगिसी कारागारीं,
त्यागवृत्ति ही अंगिकारुनी दिपविलेंस जगताला. ॥ तूंच ॥ ६ ॥

सभेंत बोलुनि फुकीं बोलणीं
देशभक्त म्हणविती तयांनीं
लोळण घ्यावी तुझिया चरणीं;
थोर योग्यता तुझी देवते ! कुलदीपक तूं तारा. ॥ तूंच ॥ ७ ॥

नाहीं तुज जन्मांत पाहिलें,
परी तुझें गुणगान ऐकिलें
जगांत साऱ्या दुमदुमलेलें;
पूज्य देवता तुज मानोनी जीव वाहिला तुजला. ॥ तूंच ॥ ८ ॥

मेलेल्या अन्नाचे भक्षक
राष्ट्रहिताचे स्वार्थी वंचक
क्षुद्र त्यांतला मीही कीटक,
चरित्र तव हो कारण माझी दृष्टी निवळायाला;
तूंच देवते ! तारक होसी स्वार्थी मम जीवाला. ॥ ९. ॥

खंडाळी, २६।११।१९३०

## खटारा

[ खालील कवितेंत वर्णिलेला खटारा न सुधारलेल्या डोंगराळ मुलुखांत पुष्कळ वेळां पहावयास मिळतो. ]

खडकाळ प्रदेशांतुनी खटारा चाले ॥ ध्रु० ॥
जिकडे तिकडे कडेकपारे
वरुनि मारतें तिरपें वारें
सोसाट्यानें भरे कांपरें
गाडीवाला संथ कसा हा आसमंत जरि हाले. ॥ १ ॥
प्रात:काळीं घरुनि निघाला,
सूर्यास्ताचा समय जाहला
तरी कोसभर नाहीं आला;
किती अंतरावरती आहे मकाण याचें नकळे. ॥ २ ॥
किती खटारे वाटेवरले
मागुनि याच्या जरी निघाले
मागुनि आले पुढती गेले
संथपणें चालला खटारा वरचेवर ठेंचाळे. ॥ ३ ॥

जूं गाडीचें असे मोडकें
तया जोडले बैल रोडके,
बावखळ्याचें लाकुड किडकें
खडकावरि आदळून सगळे फुटले सांधेमोळे. ॥ ४ ॥

फुटकीं चाकें करकर करिती,
मधुनी मधुनी कुण्या निसटती,
धावा तुटती खडकांवरती,
समजायाचें नाहीं केव्हां होतिल त्यांचीं शकलें. ॥ '५ ॥

असा खटारा खिळखिळलेला
वरि हाणाया मालक बसला;
स्थिती आंतली ठाउक त्याला,
आवेशानें हाणित सुटला खुशाल झांकुनि डोळे. ॥ ६ ॥

न मिळे खाया जया पोटभरि
निर्बल बैलांच्या पाठीवरि
निर्दयतेनें आसुड मारी;
करी कसायासमान मालक असले निष्ठुर चाळे. ॥ ७ ॥

भीतीनें थरथरा कांपती
तरी बैल ओढाया झटती,
खडकावरि ठेंचाळुनि पडती,
परी खटारा जागेवरुनी तसूभरी ना हाले. ॥ ८ ॥

जीर्ण खटारा घेउनि असला
बैल हडकुळे जोडुनि त्याला
खडतर वाटेंतुनी निघाला
खुळा खटारेवाला, याला काय म्हणावें न कळे !
खडकाळ प्रदेशांतुनी खटारा चाले. ॥ ९ ॥

खंडाळी, २८।११।१९३०

## अभागी अबले !

( चाल – भिउं नको वेडे० )

**अभागी अबले !** रडुं नको पूस तव डोळे. ॥ ध्रु० ॥

रात्रंदिन वर्षतात तुजवर
जननिंदेचे प्रहार खरतर
निमुटपणें सोसुनी जन्मभर
**अखंड कष्टी** जीवन नेणें तुझ्या कपाळीं आलें. ॥ १ ॥

खाणी उज्ज्वल सौंदर्याची
सुशील गृहिणी कुलवंताची
स्थिति ऐशी तव पूर्वकालिंची
**परी अकालीं** वैधव्यानें अनाथ तुजला केलें. ॥ २ ॥

प्रचंड वणवा भडकुनि रानीं
गांगरलेली अनाथ हरिणी
गवसावी भडक्यांत चुकोनी
तशीच झाली तव जन्माची कर्मकहाणी अवले ! ॥ ३ ॥

जगांत सौंदर्याच्या भंवतीं
दुष्ट गिधाडें घिरट्या घालिति
तुज एकानें बघुनि एकटी
क्रूरपणानें झडप घालुनी जर्जर तुजला केलें. ॥ ४ ॥

भाईबंदांतुनी एकला
मानिलेंस तूं बंधू ज्याला
तुझ्याच अब्रूवरती घाला
घालुनि त्यानें केलें तुझिया जन्माचें वाटोळें. ॥ ५ ॥

तोच नराधम परि प्रौढीनें
जगीं वावरे उजळपणानें
केलें त्याचें काय जगानें ?
पतिता म्हणुनि तुलाच सगळे धिक्काराया सजले. ॥ ६ ॥

कुणि एखादी अबला फसली
दुर्दैवाची तिच्या टवाळी
करुनि तिच्या जन्माची होळी
टाळ्या पिटुनि पेटविणें हें ब्रीद जगाचें ठरलें. ॥ ७ ॥

तुडवण करुनी कळ्याफुलांची
नीच पाउलें वंदायाचीं
अशीच उलटी रीत जगाची;
हांसत पाहे जग दुबळ्यांचे धिंडवडे झालेले. ॥ ८ ॥

पतिता म्हणुनी तुला निंदिती.
अघोर पापी तयांतिल किती,
पुण्यवंत म्हणुनियां मिरविती
निंदक सज्जन अगणित असले जगांमधें भरलेले. ॥ ९ ॥

परिस्थिती ही अशी जगाची,
जननिंदेची अथवा स्तुतिची
पर्वा मग कां करावयाची ?
अवघड मानूं नकोस तुजला जरी जगानें त्यजिलें. ॥ १० ॥

प्रमाद घडला तुझ्याकडोनी,
रडसी पश्चात्तापें जळुनी,
कढणाऱ्या या तव अश्रूंनीं
मालिन्याचे कलंक भगिनी ! पार धुवोनी गेले. ॥ ११ ॥

सोडुनि दे हा विषाद सारा;
नको जुमानूं धिक्काराला;
पापी मानूं नको स्वतःला;
कर्तव्याचें क्षेत्र बघुनि घे भंवतीं विस्तरलेलें. ॥ १२ ॥

किती तुझ्यासम अनाथ अबला
रडत कंठिती आयुष्याला,
तयांस लावी सन्मार्गाला;
भगिनीसेवाव्रत आचरुनी ने जीवित उरलेलें.
अभागी अबले ! रडुं नको पूस तव डोळे. ॥ १३ ॥

खंडाळी ७।३।३१

# मोटेवरचें गाणें

( चाल – लावणीची. )

प्रभातकालीं मोटवणावर कोण गीत गाई,
साथ ही कोण त्यास देई, चला ती बघुंया नवलाई. १
भिरभिरताहे शीत आणखी मंदमंद वारा,
हर्षला विहगवृंद सारा, फुलोरा खुलला हंसणारा. २
अनुपम शोभा दावितसे ही आम्रवृक्षराजी
फुलांची नवाळ जी ताजी, लुटुनि ती उडति भृंगराजी. ३
विहीर रेखिव तियेंत भरलें निवळशंख पाणी;
माचाड उंच वरुनी, आंत जणुं बघते वांकोनी. ४
धाव उतरती पाट चालला तिजला खेटोनि
पिकाला जाणारें पाणी, खळाखळा वाहे त्यांतूनी. ५
झरझर चाले मोट मिळेना उसंत मुळिं तिजला,
विसावा कुठला बैलांला? तयांच्या तरुण मालकाला? ६
अठरा एकोणीस असावी उमर जवानाची
काय ही ऐट पचंगीची? खादिच्या आखुड कुडत्याची. ७

रुंदट छातीवरती लोळे ताइत डौलानें,
  गातसे सुरावरी गाणें, चालली मोट झपाट्यानें. ८
सुरेल गाई गीत तयाचा गोड किती साद
  सभोंतीं दूर घुमे नाद, उठे मग सुंदर पडसाद. ९
गोंडस रेखिव मुळीं नोहती रचना गाण्याची,
  लूट जरि कोमल भावांची, कशाला पर्वा रचनेची ? १०
गाणें होतें राघूसाठीं झुरत्या मैनेचें
  भाबड्या अल्लड तरुणीचें, तियेच्या पहिल्या प्रीतीचें. ११
इष्काच्या गाण्यांत रंगला एकतानतेनें,
  गातसे हौसेहौसेनें, रंगली सृष्टी गानानें. १२
गीतांमाजी सूर मिसळुनी चाक करी सांथ,
  रंगुनी सुरेल गीतांत, नाचतें पाणी पाटांत. १३
रंगुनियां लागला उंसाचा फड डोलायाला,
  लागलें वेड मक्याणाला, तुऱ्यांचा नाच सुरू झाला. १४
गीताची मोहिनी यापरी सृष्टीवरि पडली
  वृत्ति मम रंगुनियां गेली, मनाची तन्मयता झाली. १५
किती वेळ ऐकिलें सारखें वाटे ऐकावें,
  गोड या गानीं गुंगावें, जगाला विसरुनियां जावें. १६

खंडाळी, १७।३।१९३१

# माधुरी

[ राजवाड्याच्या सौधावर उभ्या राहिलेल्या सुंदर तरुणीचें शब्दचित्र. ]

( जाति – सूर्यकला )

सुंदर नृपमंदिर
तयाच्या सुंदर सौधावरी
रमणी कोणीतरी
उभी ही चारुमूर्ति हांसरी. १
शुक्राची चांदणी
उतरली जणुं अस्मानांतुनी,
सौधाच्या कोंदणी
जणूं ही लखलखते हिरकणी. २
सोनसळी पातळ
शोभवी बांधा सडपातळ,
नजर खुली प्रेमळ
आणखी वदनकांती निर्मळ. ३

वेणी जरि गुंफिली
परी ही चुकार बट त्यांतली
गालावरि पातली;
लोपवी गालावरची खळी. ४
मौक्तिकसर एकला
रुळोनी स्कंधीं खुलवी गळा;
जोडिदार दूसरा
कुणीं या अधरावरि स्थापिला. ५
नाजुक तनु गोजिरी
वनींची लता जणूं लाजरी
फूल तिचें ज्यापरी
तशी ही खुलते मुखमाधुरी. ६
गात्रांवरि चारुता
कपोलीं सुरम्य आरक्तता,
नयनीं तेजाळता
विराजे वदनावरि दिव्यता. ७
अवलरली भूवरी
विधीची मूर्त कलाचातुरी,
अथवा सौधावरी
हंसे ही विश्रांतिल माधुरी. ८

बुधगांव, १९।५।१९३१

# पांखरास

[ आकाशांत उंच उडणाऱ्या पांखरास पाहून. ]

( राग – पहाडी )

भिरभिरत्या जीवा ! येच जरासा खालीं ॥ ध्रु० ॥
या जगीं बंधनें नावडतीं कोणाला
हें असुनि पांखरा ! पुरतें ठावें मजला.
उद्युक्त तुला मी भूवरि आणायाला
परि पुरविं एवढी आस मनीं जी उठली. ॥ १ ॥
सर्वदा तरंगत फिरसी वाऱ्यावरती,
पाहतां तुझी ही भिरभिरणारी मूर्ती,
मनिं अमित कल्पना उचंबळोनी येती,
त्या वदुनी दावूं सखया ! कोणाजवळी ? ॥ २ ॥

जन्मास घातलें तुज ज्या परमेशानें
काळजी वहावी तुझी हवीतर त्यानें;
तूं खुशाल गगनीं फिरसी मुक्तमनानें,
मानवा मिळे कां भाग्य तुझें कधिकाळीं ? ॥ ३ ॥

जन्मल्यापासुनी कसें जगावें याची
काळजी निरंतर जीवा जाळायाची,
जाचतीं बंधनें भंवतीं नानापरिचीं,
शांतता मिळावी जीवाला मग कुठली ? ॥ ४ ॥

भोंवतीं पहावें तरी चहुंकडे सारा
जगिं दांभिकतेचा पसरे स्वैर पसारा,
निर्भेळ गुणाला मुळीं मिळेना थारा;
भाळुनी मुलाम्यावरती दुनिया झुकली. ॥ ५ ॥

समतेचीं तत्त्वें बोलुनियां मोठालीं
दुबळ्यांस तुडविती बलिष्ठ पायांखालीं;
तुडवितो तयांना कुणि दुसरा बलशाली;
नांदते जगावरि समतानीती असली. ॥ ६ ॥

नाचती उरावरि अपराधी उन्मत्त,
निर्दोषी रखडत तुरुंगांत मरतात,
हें न्यायदेवता हांसत पाहे स्वस्थ;
न्यायाची चाले असली नित्य टवाळी. ॥ ७ ॥

तो धर्म सनातन सत्य, दया, शांतीचा
जाहला पदच्युत जगांतुनी केव्हांचा,
तोतया बसवुनी तक्तावरती त्याचा
जग मरे तयाच्या जुलुमी अमलाखालीं. ॥ ८ ॥

आंतली जरी ही परिस्थिती नित्याची
न्यायाची आणी समतेची, धर्माची
घोषणा अखंडित गर्जत ठेवायाची,
दांभिकता देते आम्हां शिकवण असली. ॥ ९ ॥

या सभोंवतींच्या जुलुमी दांभिकतेला
पाहुनियां माझा जीव विटोनी गेला;
परि हृदय खोलुनी सगळें सांगायाला
संवगडी तुझ्याविण कोण दुजा या वेळीं ? ॥ १० ॥

बेबंद मुशाफर तूं गगनप्रांतींचा,
लाडका प्रजाजन स्वतंत्रतादेवीचा,
तिटकारा तुजला अल्पहि अन्यायाचा,
मम हृदय खोललें म्हणुनी तुझियाजवळी. ॥ ११ ॥

आकाशीं घुमतो नंदनवनिंचा वारा,
मुळिं मिळे न तेथें क्षुद्र बुद्धिला थारा,
त्या स्वतंत्र वातावरणीं तूं फिरणारा
स्वातंत्र्यतुषारा तिथुनि जगावरि उधळी. ॥ १२ ॥

यश, समता, धर्म, न्याय, पांखरा पाहे,
स्वातंत्र्यामाजी सकल समावुनि राहे,
स्वातंत्र्यासाठीं म्हणुनी जग झटताहे,
झणि सांग मिळे तें जगतीं या कधिकाळीं.
भिरभिरत्या जीवा ! येच जरासा खालीं. ॥ १३ ॥

गुडगेरी, ११।१०।१९३१

## मैना

(राग – यमनकल्याण)

पिंजऱ्यांत झुरते मैना,
कुणि सोडीना । मन राहीना ॥ ध्रु० ॥
सोन्याच्या सुंदर तारांनीं गुंफिला,
मोत्यांची झालर घोंसदार त्याजला,
बहुमोल पिंजरा महालांत टांगला,
नव रंगमहालीं जरी जाहली मैनेची स्थापना. ॥ १ ॥
कधि जवळीं येई प्रासादाचा धनी,
अति लोभ दाखवी प्रेमें गोंजारुनी,
सुखवाया तिजला झटतो रात्रंदिनीं,
बसतसे पंजरीं खिन्न सदा ही तयाकडे पाहिना. ॥ २ ॥
मोत्यांचा चारा सदा पुढें ठेवुनी
खावया आर्जवें करिते दासी कुणी,
रिझवाया झटते कुणी मधुरभाषिणी,
बोले न कुणाशीं तिळही मैना चाराही खाइना. ॥ ३ ॥

उद्यान बहरलें प्रासादाभोंवतीं;
त्यामधें तरुलता आनंदें डोलती;
किति राघूमैना स्वच्छंदें विहरती;
हें बघुनि कोंडल्या जीवालागीं होति अमित यातना. ॥ ४ ॥
सुप्रभातकालीं भिरभिर वाऱ्यावरी
डौलांत पांखरें तरंगती कितितरी,
हें बघुनी मैना तडफडते अंतरीं;
कढतसे मानसीं सदा बघोनी भंवतींच्या बंधना. ॥ ५ ॥
दिनमणी तळपतो तेजस्वी अंबरीं,
उत्साह उधळितो साऱ्या जगतावरी,
अंधार माजला मैनेच्या अंतरीं,
गाळिते आंसवें बापुडवाणी विटली या जीवना. ॥ ६ ॥
सुखभोग जगींचे सज्ज हिच्या भोंवते
इंद्राचें वैभव पदीं हिच्या लोळतें;
पंजरीं बिचारी परि अश्रू ढाळिते
परि मर्म यांतलें कळलें नाहीं कधिं भंवतींच्या कुणा.
पिंजऱ्यांत झुरते मैना,
कुणि सोडीना। मन राहीना. ॥ ७ ॥

बांद्राळी, २७।२।१९३२

# धर्ममार्तंड

## एक समाजचित्र

( चाल – भूपती खरे ते० सारखी )

लावुनी लांब आडवें दुबोटी गंध
सांवरीत तुंदिल तनू चालला मंद.
लोळतसे खांद्यावरी शाल जरतारी,
ही झुकत झुकत चालली कुणिकडे स्वारी ? १

कसलीशी दिसते पोथी काखोटीला,
वाटतें चालला पुराण सांगायाला.
सप्ताह मांडिला असेल यानें कोठें
डौलांत चालली म्हणुनी स्वारी तेथें. २

जमताती श्रोते तयांतील अज्ञानी,
भाळती ऐकुनी रसाळ याची वाणी;
परी सत्य आंतलें काय खुळ्यांना ठावें ?
याचिया अंतरीं हालाहल हेलावे. ३

शृंगारिक गोष्टी सदा खुलविती याला
वर्णितो रंगुनी श्रीकृष्णाच्या लीला
चहुंकडे फेंकितो गहिरी डोळेफेंक
शिष्यिणी जाहल्या श्रोत्यांतिल कित्येक. ४

देवळांत सांगे पुराण सायंकाळीं
गांवच्या कुटाळ्या करितो उरल्या वेळीं
बसतसे सर्वदा धर्मसिंधु काढोनी
म्हणवितो सनातन धर्माचा अभिमानी. ५

इंग्रजींत झाला धर्मबुद्धिचा ऱ्हास
ओरडूनि सांगे करुनी अट्टाहास.
शिक्षितां निंदितो तयांत घेई गोडी
फूत्कार विषारी सुधारकांवरि सोडी. ६

नच कळलें याला मर्म कधीं धर्माचें
माजवी स्तोम परि उगाच धार्मिकतेचें.
बहिरंगावरती भाळुनियां अज्ञानी
कितिएक लागले सदैव याच्या भजनीं. ७

उद्दाम होउनी धर्माच्या नांवानें
सोडितो नित्य हा गरिबांवरि फर्मानें.
प्राज्ञा न कुणाची पुढती बोलायाची
खेड्यांत गाजवी सत्ता सुलतानाची. ८

दंभाचा पुतळा कुटाळकंपूवाला
कशि धर्ममूर्ति ही पदवी शोभे याला ?
गाजला आजवरि आर्यधर्म जो भुवनीं
तो काय तारिला असल्या खादाडांनीं ? ९

दंभाचीं कवचें फोडुनि सारीं वरचीं
पाहिजे जाहली जगिं पारख असल्यांची.
ही जागरूकता जोंवरि नाहीं आली
या बांडगुळांची तोंवरि पिकते पोळी. १०

खंडाळी, २८।२।१९३२

# उमलत्या फुला !

( राग – मांड )

उमलत्या फुला ! सांगतों तुला,
धरुं नको वृथा अभिमान. ॥ ध्रु० ॥

संपन्न बगीचा खुला
हा तुजभंवतीं पसरला
कमतरता नाहीं जला
सौंदर्य खुलावें तुझें म्हणोनी प्रयत्न सगळे जाण. ॥ १ ॥

ही विहीर सुंदर पहा
कशि तुडुंब भरली अहा !
किति सुरेख बघ पाट हा.
जल तुझ्याचसाठीं पाटांतुनि हें झुळझुळ वाहे छान. ॥ २ ॥

जातीचा सुंदरपणा
मोहवी जगीं ना कुणा ?
जग त्याची जोपासना
झटतसे कराया परि हें सारें स्वार्थाचें थैमान. ॥ ३ ॥

रिंगणी कण्हेरी किती
कुंपणांत फोंफावती,
बाभळी स्वैर माजती,
देखाया त्यांना सांग जगीं का कुणी वळवितो मान ? ॥ ४ ॥

तव सौंदर्याची कळी
ही फुलावया लागली,
जपणूक म्हणुनि चालली.
कळि खुले तोंवरी ही लोभाची चढेल रोज कमान. ॥ ५ ॥

उमलतेपणीची नवी
मनमोहक ही टवटवी
जोंवरी तुला भूषवी
तुजभंवतींभंवतीं फिरणारांची मुळीं न तुजला वाण. ॥ ६ ॥

तव सुंदरता पाहुनी
जग जाई वेडावुनी
तुजभंवतीं रात्रंदिनीं
नाचतें म्हणोनी अभिमानानें होउं नको बेभान. ॥ ७ ॥

सौंदर्य तुझें हें फुला !
दो दिवसांचा मामला
लोपतांच जग हें तुला
कुस्करोनियां फेंकील समजुनी रस्त्यावरची घाण. ॥ ८ ॥

दे हुरळपणा सोडुनी
ईश जो जगाचा धनी
त्यावरी भार ठेवुनी
स्वार्थान्ध जगीं या जीवन नेई ठेवुनियां अवधान.
उमलत्या फुला ! सांगतों तुला, धरुं नको वृथा अभिमान. ॥९॥

खंडाळी, १।३।१९३२

# दुर्जनास

[ खालील कविता व्यक्तीला उद्देशून लिहिलेली नाहीं; जगांतील दुर्जनांच्या जमातीला हा सामुदायिक आहेर आहे. ]

( जाति – पद्मिनि )

भेकडा ! खुशाल करि वल्गना ॥ ध्रु० ॥
शिंतोडे उडवुनी मजवरी
दमुनी गेले हात तुझे जरि
झेलियले मीं सहज फुलापरि
कोण जुमानी मंडूकाची कूपांतिल गर्जना ? ॥ १ ॥
मळलेल्या मार्गाचे वैरी
ध्येयनिष्ठ जे कुणी जगावरि
फेंकावें जिव्हास्त्र तयांवरि
तव जातीची ही शौर्याची ठरलेली कल्पना. ॥ २ ॥
तोंडाच्या पोकळ वाफांनीं
कोमेजावें जगीं फुलांनीं,
खडक तयांना कधिं न जुमानी;
खडकावरती फुटतिल तोंडें ठाउकें न हें कुणा ? ॥ ३ ॥

आजवरीचे तुझे इषारे
खडकावरले हळवे वारे
उधळितोस कां असे फुके रे ?
भ्याडावरती खुशाल त्यांची करीत जा योजना.॥४॥
भाराभर बापुडीं दानवीं
वर्षाकालीं जन्मा यावीं
हिंवाळ्यांत तीं मरुनी जावीं
गती तुझी तैशीच शेवटीं पटलें माझ्या मना.
भेकडा ! खुशाल करि वल्गना. ॥ ५ ॥

खंडाळी, २।३।१९३२

# शिकार

( चाल – पोवाड्याची. )

बांधावरती दाट माजल्या केकताडिच्या मधून्
सैरावैरा रानसशाचें पोर पळे बावरून्. ॥ ध्रु० ॥

१

चढुनी आला होता वरती आकाशीं भास्कर
तापत होतें उन्ह रखरखी रानामाळावर,
असल्या वेळीं कुणी शिकारी शिकार खेळायला
तल्लख कुतरे दोन घेउनी माळावरि पातला.
जणुं घारीची नजर तयाची कुतरेही त्यापरी
उठेल सावज म्हणुनी भटकत होते माळावरी.
बांधावरि खसपस कांहीं वाजलें,
हळुं केकताडिचें पातें हाललें,
तीराच्या वेगें कुतरे धावले.
पाहत होता मौज शिकारी दुरुन ढेपणीवरून्
सैरावैरा रानसशाचें पोर पळे बावरून्.

काळदूत ते अधीर होउनि धांवति बांधावरी
तयांस वाटे लपलें येथें सावज कांहींतरी.
आणी होतें खरेंच गोंडस पोर सशाचें तिथें
केकताडिच्या फडांत लपुनी भेदरुनी पाहतें.
चाहुल घेउनि फडांत घुसले कुतरे दोन्हीकडून्
थरथर कांपे पोर तयांना मागेंपुढती बघून्.
भेसूर मुसकुटें त्यांचीं पाहुनी
नजरेंत क्रूरता भरली जाणुनी
सोडिला ठाव हृदयानें त्या क्षणीं
नजर चुकवुनी हळूंच निसटे केकताडिच्या मधून्
सैरावैरा रानसशाचें पोर पळे बावरून्.

३

नाहीं दुसरें प्यार कुणाला जगिं या प्राणाहुनी
दीन सशाचें पोर सारखें पळे जीव घेउनी.
मधेंच राहे लपुनि दाखवी मधेंच हुलकावणी
होलपटीनें कुतरें गेलें क्षणभर भांबावुनी.
कितीवेळ परि जीव चिमुकला पळेल काळापुढें ?
गात्रें शिणतां हतबल होउनि धरणीवरती पडे.

विक्राळ दूत काळाचे पातले,
पकडींत तयांच्या दुबळें तळमळे,
मृदु शरिरीं त्याच्या घुसले झणि सुळे,
पोर बिचारें मरुनी गेलें उन्हांमधें तडफडून्
विजयश्रीची परि आरोळी उठे ढेपणीवरून्.

बुधगांव, ३।७।१९३२

## मनास

[ परिस्थितीमुळें भांबावलेल्या मनास उद्देशून प्रस्तुत कविता लिहिला आहे. ]

( जाति – नववधू )

भिउं नको मुळिंही मना ! संशयी सोड कल्पना. ॥ ध्रु० ॥

जगांत कांहीं कालापुरतें
असत्य विजयी जरी भासतें
चंचल यश जावोनि लयातें
उजळतेंच अंतीं सत्य पुन्हा. ॥ १ ॥

सात्विकतेचे कट्टे वैरी
दुर्जन असले जगीं कितितरी
गांजुनियां सत्यास परोपरि
मिरविती आपुला असुरपणा. ॥ २ ॥

तुफान झंझावात सुटूंदे,
प्रचंड हिमनग कोलमडूंदे,
गदगद हा भूगोल हालुंदे,
परि सत्य सोडिना स्वस्थाना. ॥ ३ ॥

सत्य, दया, शांतीचे सागर
आज यातना भोगिति खरतर,
कठिण काळ हा सरेल सत्वर,
पाहूंच खचित त्या भाग्यदिना. ॥ ४ ॥
काल चांदणें सुंदर फुललें,
आज गगन मेघांनीं भरलें,
निर्दाळोनी ढग हे काळे
झळकेल उद्यां नभिं चंद्र पुन्हा। भिउं नको मुळिंहि मना! ॥ ५ ॥

बुधगांव, १४।८।१९३२

## याचना

मी होउनियां लाचार देवते ! आलों तुझिया दारीं. ॥ ध्रु० ॥

संपन्न केवढ्या अधिकारानें असलों,
गुणवंत म्हणोनी जगीं ख्यात जरि झालों,
निर्भेळ सुखाचें धाम जगाला दिसलों,
सांगतों दयाळे ! तुला आंतली गोष्ट खरोखर न्यारी. ॥ मी० ॥ १ ॥

संपूर्ण यशस्वी जीवन असतांनाही
बोंचतें सारखें शल्य मनाला कांहीं,
त्यामुळें शांतता जिवास तिळही नाहीं,
गुदमरल्या वातावरणीं होतो जाच जिवाला भारी. ॥ मी० ॥ २ ॥

लोळती वैभवीं तयां सुखी मानावें,
हें तत्त्व जगीं या जरी सत्यता पावे,
परि सत्य आंतलें ज्यांचें त्यांना ठावें;
शांती न मनाला म्हणुनी रडती कितीक सत्ताधारी. ॥ मी० ॥ ३ ॥

सम्राट असूंदे कितिही वैभवशाली,
चतुरंग दळेंही पाळूंदे मोठालीं,
थरथरो अखिल जग त्याच्या सत्तेखालीं,
तिळ शांतीस्तव तो दुनियेवरली सोडिल सत्ता सारी. ॥ मी० ॥ ४ ॥
प्रार्थितों म्हणोनी हात जोडुनी तुजला,
याचना एवढी माझी पुरवायाला
शांतता मनाची अखंड देईं मजला,
तिजपुढें वैभवें गमती मजला तुच्छ जगांतिल सारीं.
मी होउनियां लाचार देवते ! आलों तुझिया दारीं. ॥ ५ ॥

बुधगांव, २५।९।१९३२

# सेनापतीचा आदेश

[ स्वराज्यकालीन महाराष्ट्रीय सेनापति समरप्रसंगीं आपल्या सैनिकांस उद्देशून असाच आदेश देत असतील. ]

माझिया शूर सैनिकांनो !
धुरंधर मर्द मराठ्यांनो !
शत्रुच्या कर्दनकाळांनो !
सांडुनी प्रसंगीं प्राणहि ' भगवा झेंडा ' राखावा. ॥ १ ॥

सभोंतीं रणसागर खवळे,
वरुनि जरि पर्वत कोसळले,
गदगदा जरि धरणी हाले,
फडकत्या निशाणापासुनि तिळही पाउल नच ढळवा. ॥ २ ॥

निशाणा बघुनि अघाडीला
स्फुरण ये अवघ्या सेनेला,
शत्रुशीं झुंज करायाला
चेतना मूर्त ही संग्रामाची वाऱ्यावरि झुलवा. ॥ ३ ॥

हवेवरि निशाण फडफडतें,
मराठी सेना तळिं लढते,
शत्रुबल भेदरुनी पळतें,
रोमांचकारि हें दृश्य जगाला आज रणीं दावा. ॥ ४ ॥

लागुनी समराची तृष्णा
पातला शत्रू आज रणा;
समोरी ही त्याची सेना
माजलीं गिधाडें झडपुनि त्यांना दाहिदिशा पळवा. ॥ ५ ॥

शत्रुला रणांत रगडोनी,
सांडुनी रक्ताचें पाणी,
रोंविला राष्ट्रवृक्ष ज्यांनीं,
ते याच निशाणातळीं झुंजले जागृति ही ठेवा. ॥ ६ ॥

स्थापिलें स्वराज्य शिवबांनीं
मराठी निशाण हें म्हणुनी,
अर्पिलें तया समर्थांनीं,
तेधवांपासुनी रणीं अवतरे हा झेंडा भगवा. ॥ ७ ॥

देणगी दिव्य समर्थांची
खूण ही जिवंत राष्ट्राची;
चेतना महाराष्ट्रभूची;
समरांत फडकुनी सतत वाढवी महाराष्ट्रविभवा. ॥ ८ ॥

फडकतें निशाण हें जेथें
गुंगते विजयश्री तेथें;
सभोंतीं स्फूर्ती संचरते.
सांभाळुनि समरीं ‘ निशाण ’ राखा राष्ट्राच्या नांवा. ॥ ९ ॥

आठवा सदैव शिवराजा
स्मरोनी महाराष्ट्रकाजा;
रणांगणिं समशेरी परजा;
हर ! महादेव ! गर्जुनी मोहरा शत्रूवरि चढवा. ॥ १० ॥

माझिया शूर सैनिकांनो !
धुरंधर मर्द मराठ्यांनो !
शत्रुच्या कर्दनकाळांनो !
सांडुनी प्रसंगीं प्राणहि ‘ भगवा झेंडा ’ राखावा. ॥ ११ ॥

गुडगेरी, ९।१०।१९३२

# रांगोळी

[ चैत्रांगण काढणारी एक सुंदर बालिका पाहून. ]

( चाल – महाराष्ट्रगीतासारखी )

अंगणांत सुंदर ही कोण बालिका
  रंगुनियां काढितसे रंगवाल्लिका ?
भंवतींच्या जगताचें भान हिज नुरे;
  हिजभंवतीं गुंगत माधुर्य संचरे. ॥ १ ॥

सृष्टीच्या बागेंतिल गोड ही कळी,
  रसरसली परि अजुनी नाहिं उमलली;
वदनावरि विलसे निष्पाप चारुता,
  हारविते देहभान सहज पाहतां. ॥ २ ॥

सारविल्या भूमीवरि झरझरा पहा,
  गौरवर्ण हात हिचा फिरतसे अहा !
चपलगती पाहुनियां भासते मला
  धूसरशा मेघावरि फिरत चंचला. ॥ ३ ॥

चित्रकला काय हिच्या हातिं खेळते !
कौशल्यें चित्रें किति सहज काढिते.
शंख, चक्र, पद्म, गदा, सकल आयुधें
क्षणिं एका बाला ही काढिते मुदें. ॥ ४ ॥

कमलासम हातपाय गोजिरे जिचे
भुवयांचीं वलयें जणुं चाप समरिंचे;
नजरबाण सज्ज जिच्याजवळ राहती
तिजपुढती निर्जिव हीं आयुधें किती ? ॥ ५ ॥

उठती ज्या हृदयिं हिच्या रम्य कल्पना
उमटतात वदनीं त्या स्पष्ट भावना;
म्हणुनि होइ वदन मधुनि मधुनि हांसरें,
सुंदरशा चित्राची कल्पना स्फुरे. ॥ ६ ॥

चालूंदे स्वैर हिची चित्रकुशलता,
राहूंदे गोड अशी एकतानता;
पाहियलें किति, नाहीं तृप्ति लोचनां,
सुंदर हें दृश्य वेड लाविना कुणा ? ॥ ७ ॥

बुधगांव, १४।४।१९३३

# विहंगम

[ खालील कवितेंत वर्णन केलेला विहंगम हा जगांतील **शांततावादी सात्त्विक** सत्तेचें प्रतीक आहे. ]

( राग – बिहाग )

स्वैर गगनिं हा फिरे विहंगम ! ॥ ध्रु० ॥
उधळित किरणें दाहिदिशांवर,
पूर्वेला ये उदया दिनकर,
आणि तरंगे हा वायूवर;
स्फूर्तीचा तेजाचा संगम. ॥ १ ॥
जीवनकलहातळीं दडपलें,
कृत्रिमतेला जग हें भुललें,
गिळावयाला तया संचरे
जगिं स्वार्थाचा राक्षस दुर्दम. ॥ २ ॥
सत्ता होउनि मत्त आसुरी
पिंगा घाली अखिल जगावरि,
तयामुळें चहुंकडे भूवरी
परवशतेचा माजे कर्दम. ॥ ३ ॥

वात विषारी वाहति जगभर,
तांडव करिती दैत्य अनावर,
परिस्थिती ही असली दुर्धर
सुचवीते प्रलयाचा आगम. ॥ ४ ॥

प्रलयांतुनि या जग ताराया,
दिव्य तया संदेश द्यावया,
वातावरणीं निघे फिराया,
शांतिदूत स्वर्गीय विहंगम.
स्वैर गगनिं हा फिरे विहंगम ! ॥ ५ ॥

बुधगांव, १६।४।१९३३

## आज आणि उद्या

[ आजच्या कर्तव्याबद्दल उदासीन राहून उद्याची निष्कारण काळजी वाहणाऱ्या तरुणास उद्देशून खालील कविता लिहिली आहे. ]

( राग – पिलू )

आजची काळजी वाहें । मग बोल उद्याचे बोल. ॥ ध्रु० ॥
अपार वैभवशिखरावरती
पूर्वज होते करुनी वसती,
आज पसरली ही तुजभंवतीं
दारिद्र्याची, औदास्याची दरी भयंकर खोल. ॥ आजची० ॥ १ ॥
तडफडुनी या दरींत मरणें,
अथवा वरतीवरती चढणें,
प्राप्त आजला हें ठरवीणें,
तें सोडोनी, कशास पुढची चिंता करिसी फोल ? ॥ आजची० ॥ २ ॥
भंवतालीं कांटेरी कुंपण
तयामधें राहून चिरंतन
कृमिकीटांचें जगसी जीवन,
मूढ म्हणोनी परिस्थितीला व्यर्थ लाविसी बोल. ॥ आजची० ॥ ३ ॥

प्राक्तनवादी बनुनि आळशी
अन्नाविण मरतोस उपाशी,
क्षणभंगुर जगिं वैभव म्हणसी,
शिकवण ही नादानपणाची लाथाडुनि दे फोल. ॥आजची०॥४॥
दैवावरती अवलंबोनी
फुकट मरावें नादानांनीं;
तुजसमान जे तरुण तयांनीं
निःस्वार्थी पुरुषार्थ दावुनी हलवावा भूगोल. ॥ आजची० ॥५॥
त्यागवृत्तिनें सदा झगडले,
चिरंजीव नरवीर जाहले,
ध्येय ठेवुनी उज्ज्वल तसलें,
तें साधाया बेगुमान दे सर्वस्वाचें मोल.
आजची काळजी वाहें ! मग बोल उद्याचे बोल. ॥ ६ ॥

बुधगांव, १०।८।१९३३

# खेड्यांतील देखावा

[ खेडेगांवीं शेतास जाण्यास मळलेल्या पायवाटा अगर गाडीवाटा असतात, अशा एका गाडीवाटेवरून दिसणारें दृश्य खालील कवितेंत चितारलें आहे. खेडेगांवांत दारिद्र्य असतें; पण असलीं मजेदार दृश्येंही असतात. ]

( राग – मांड )

घे जिवा दृश्य हें डोळे भरुनी बघून ॥ ध्रु० ॥
राहुनी उभे या वाटेवरती इथें
बघ चहुंबाजूंला नजर जिथें पोंचते,
लवमात्र दिसे का कृत्रिमता तुज कुठें ?
नांदते शांतता दाहि दिशांनीं भरून.

आकाश पसरलें निळेंभुरें हें वरी,
पांढुरके फिरती मेघखंड ज्यावरी
भटकती खालुनी घारी या कितितरी,
पंखांचीं पातळ अवजारें विस्तरून.

कुंपणाकडेनें तरवड फोफावले,
हांसती जयांवर मजेंत पिवळीं फुलें,
रसरशीतपण जें तयांवरी आढळे,
बागेंतिल नटव्या फुलांमधें तें कुठून ? ३

दिसतात उभ्या या इथें तिथें बाभळी,
पसरुनी आपुली जाळिदार सांवली;
विस्तीर्ण तयांतिल असती त्यांच्या तळीं,
मेंढरें दमूनी बसलीं दाटी करून. ४

ओहोळ रुंद हा बाजूला विस्तरे,
जो वर्षाकालीं खळखळतो जलभरें,
रेताड कोरडे आज तयाला उरे;
निर्धनता साहे परि संतोषें हंसून. ५

कडुलिंबारे हे दोन तीन या स्थळीं
साळुंक्या करिती किलबिलाट ज्यांवरी;
बांधिलें दिसे हें कुणी तयाच्या तळीं,
पाल्याचें खोंपट कसेंतरी सांवरून. ६

खोंपटासमोरी बाळ एक रांगतें,
तें दाराआडुनि कुणीतरी पाहतें;
सर्वत्र सभोंतीं प्रसन्नता नांदते,
खेड्याचें जीवन गोड इथें ये दिसून. ७

अतिउंच हवेल्या आणि क्रीडांगणें,
शहरांतिल कृत्रिम चैनीचीं साधनें,
या नवलाईला भुललीं ज्यांचीं मनें,
दृश्य हें मनोहर तया रुचावें कुठून ?

सौंदर्य या स्थळीं नटवें मुळिं नाढळे,
सर्वत्र शांतता भरलीसे त्यामुळें,
मन गुंगुनि जातें प्रसन्नतेच्या बळें,
मग कृत्रिमतेचें दडपण जातें विरून.

घे जिवा दृश्य हें डोळे भरूनी बघून.

खंडाळी, २६।१०।१९३३

# खार आणि घार

( जाति – दोहा )

हांसत होती चैत्राची प्रशांत एक सकाळ;
नाचत होतीं सूर्याचीं किरणें रानोमाळ;
फांदीवरती लिंबाच्या पळुनी खेळे खार,
नाचूंदे अटकाव तिला कोण कसा करणार? १

सरत्या फाल्गुनमासाचें कडक ऊन्ह तापून
गेलीं होतीं सुकलेलीं पानें पार गळून,
फुटली होती झाडांना चैत्रपालवी गोड,
कवळ्या पानांनीं फुलले लिंबाच्याचें खोड. २

टोंकाकडच्या फांदीला मानुनियां मैदान
धांवत होती खारोटी दृश्य दिसे तें छान.
वागडतो बेभानपणें अहा! चिमुकला जीव;
विधिघटनेची परि व्हावी कशी तया जाणीव? ३

फांदीवरती पाहोनी बागडणारी खार
झाडाभंवतीं आशेनें घिरट्या घाली घार;
वाऱ्यावरती फिरतांना नजर रोंखुनी नीट
किरण साधुनी झडपावें म्हणुनी पाही वाट. ४

झाडावरल्या जीवाला ही नव्हती जाणीव,
आशंकेनें परि माझा उडुनी गेला जीव;
सोसाट्यानें ये खालीं तीरासम ती घार,
फांदीवरुनी एक उठे अस्फुटसा चीत्कार. ५

जीव चिमुकला झडपोनी पार उडाली घार,
गालावरुनी ओघळली माझ्या अश्रूधार.
आर्तांचे चीत्कार किती जाती रोज विरून ?
आक्रंदन परि दुबळ्यांचें जगीं ऐकितो कोण ? ६

* * * *

असेल कोणी या जगतीं घारीचाही काळ,
तोहि तिला झडपील असा भरुनी येतां वेळ.
जीव चिमुकला आज परी करुनी मातीमोल
विजयी भटके आकाशीं घार मात्र बेताल. ७

खंडाळी, १०।३।१९३४

# सारंगीवाला

[ सारंगीच्या साथीवर गाणें गाऊन भीक मागत हिंडणाऱ्या गायकास पाहून प्रस्तुत कविता लिहिली आहे. ]

(जाति – पादाकुलक)

वाजवीत सारंगी फिरतो,
त्या साथीवर गाणें गातो. ॥ ध्रु० ॥

* * * *

अडकवुनी झोळी खांद्याला
भटकतसे सारंगीवाला;
गाणें विकितो पै-पैशाला,
दिडकी परि त्या कोणि न देतो. ॥ १ ॥

साफ करोनी कंठ जनानी
तींच तींच इष्काचीं गाणीं
गात हिंडतो घोळघोळुनी,
रडवीं गाणीं कोण ऐकितो ? ॥ २ ॥

विरहाग्नीच्या भडकुनि ज्वाला
तयांत कोणी भाजुनि मेला,
प्रेमास्तव कुणि फकीर झाला,
त्या मर्दांचीं गाणीं गातो. ॥ ३ ॥

स्फूर्तीचा आवेश न ज्याला
असलें गाणें ऐकायाला
रिकामवाणा वेळ कुणाला ?
जीवनकलहीं निमग्न जो तो. ॥ ४ ॥

बेकारीचें पिशाच्च भेसुर
पिंगा घालित हिंडे जगभर,
नाचवितें कोलीत घरोघर,
तांडव बघुनी जीव दडपतो. ॥ ५ ॥

अखिल जगीं या सांप्रतकाळीं
सत्तेसाठीं रणें माजलीं,
सदैव चाले समरधुमाळी,
ऐकवे न कल्लोळ उठे तो. ॥ ६ ॥

कानठळ्या बसवितील ऐशा,
आरोळ्यांनीं धुंद दशादिशा,
व्यापुनियां भूतल-आकाशा
संग्रामाचा निनाद घुमतो. ॥ ७ ॥

या नादें भूगोल हादरे;
थरथरतें नभमंडल सारें;
भयें कांपती रवि, शशि, तारे;
प्रलयकाल भीषण आठवतो. ॥ ८ ॥

संक्रमणाच्या दुर्धर कालीं
अचेतनाला चेतविणारीं
उज्ज्वल गाणीं गावीं असलीं;
त्या गाण्यांनीं जीव रंगतो. ॥ ९ ॥

काळ, वेळ मुळिं न कळे याला,
म्हणुनि खुळा सारंगीवाला
व्यर्थ शिणवुनी सारंगीला
भिकार गाणीं गात भटकतो. ॥ १० ॥

* * * *

वाजवीत सारंगी फिरतो,
त्या साथीवरि गाणें गातो. ॥ ध्रु० ॥

बुधगांव, २४।९।१९३४

# तांबडी कण्हेर

[ फुलवेली पाटाच्या पाण्यावर जगतात; कण्हेरीला कोणी पाणी देत नाहीं अगर तिची कष्टमशागतही कोणी करीत नाहीं. कण्हेरीला त्याची अपेक्षा नसते. जगांतील धक्काधकीच्या मामल्यांत फुलवेलींच्या नाजूक व परावलंबी जीवनापेक्षां कण्हेरीचें कणखर व स्वावलंबी जीवनच अखेर यशस्वी ठरावयाचें. ]

( जाति – पादाकुलक )

गांवाच्या बाहेर कुणाची
सुंदर होती बाग फुलांची;
बागेच्या कुंपणाकडेला
मावळतीला पाट चालला. १

उंचट त्या पाटाशेजारीं
टवटवली तांबडी कण्हेरी;
फुलें टपोरीं तिचीं लालसर
डुलती वाऱ्यावरी निरंतर. २

दोन्ही वेळां पाटांतूनी
दुथडीं भरुनी वाहे पाणी;
परि त्या पाण्याकडे तियेनें
नाहिं पाहिलें कधिं आशेनें. ३

वर्षाकालीं मेघ वर्षुनी
        जेव्हां जलमय होई अवनी,
त्या काळीं जें मिळेल जीवन
        करी सालभर त्यावरि गुजरण. ४

जाइ, जुई, गुलछबू, मोगरी
        आणि नाचऱ्या नाजुक वेली,
हंसती जीवन बघुनि तियेचें;
        गरिबीचें परि संतोषाचें. ५

पाटवणाच्या पाण्यावरचें
        नटवें जीवन फुलवेलींचें
बघे निरंतर परि केव्हांही,
        तया कण्हेरी भुलली नाहीं. ६

असाच कांहीं काळ लोटला,
        रखरखला अनिवार उन्हाळा;
वळवाचा पाऊस एकही
        उन्हाळ्यांत मुळिं पडला नाहीं. ७

नक्षत्रें मागलीं झडीचीं
        आलीं गेलीं सर्व फुकाचीं;
घोर चहुंकडे पडे अवर्षण
        झाले चिंतातुर सारे जन. ८

शुष्क नद्यांचीं पात्रें झालीं,
तळीं आटलीं सुकल्या विहिरी;
पाणी तुटतां फुलबागेचें
झालें जंगल ओस तियेचें. ९

ढासळलेल्या पाटवणावरि
शुष्क माजलें गवत कितितरी;
होरपळोनी सगळे वाफे
फुलझाडांचे वठले ताफे. १०

आणी नटव्यां त्या फुलवेली
सुकल्या त्यांची वार्ता नुरली;
परि हांसे पाटाशेजारीं
टवटवीत तांबडी कण्हेरी. ११

प्रसन्नतेनें होता आला
फुलांकळ्यांचा बहर तियेला,
कुंपणांतल्या झुडुपासंगें
गुजगोष्टी ती करीत रंगे. १२

खंडाळी, १३।१२।१९३४

# दोन पतंग

[ वाऱ्यावर उडणारे पतंग आपण नेहमीं पाहतों. या पतंगांच्या खेळांत दोन पतंगांना एकमेकांवर सोडण्याची लहर पतंग उडविणाऱ्यांना केव्हां केव्हां येते. दोन पतंग मग एकमेकांवर तुटून पडतात व फाटून भरकटून जातात. पतंग खेळणारे मात्र नामानिराळेच ! ]

( चाल – सुप्रभाति सूर्य निघे० )

गगनाच्या पोकळींत भिरभिर वारा वाहे,
आनंदुनि मुक्तमनें पक्षीगण उडताहे;
वाऱ्यावरि सुटलेले दोन सुबकसे पतंग
विहरोनी भूषविती गगनाचें अंतरंग; १
क्षण निश्चल राहोनी क्षणिं घेती गोड डोल,
विसरोनी देहभान मारिति गिरक्या खुशाल.
जणुं तरळति आकाशीं मेघखंड पांढुरके,
नील जळावरि अथवा पोहति सुंदर बदकें. २

लाडावुनि ते पतंग लागति जवळी याया,
भाऊ भाऊ झाले उत्सुक जणुं भेटाया;
परि अवचित कां न कळे सरले ते दूरदूर,
रोधितसे त्यांलागीं खास कुणी सूत्रधार. ३
होय, पहा मैदानीं दिसति उभे कोण दोन;
तेच निमुट चाळविती सगळीं सूत्रें तिथून;
रोधक ते लहरीनें फिरवितील जेविं हात
त्या तालावरि गगनीं हे पतंग नाचतात. ४
निमिषमात्र मनिं माझ्या उठले असले तरंग,
तेवढयांत गगनाचें खळबळलें अंतरंग;
सोसाटयानें उठला वाऱ्याचा प्रबल झोत,
दाहिदिशा व्यापोनी घुमघुम आवाज उठत. ५
बघुनी हें बहु झाला हर्ष सूत्रचालकांस,
कोणाचें संकट तें खेळ गमे जगिं कुणास;
जाणुनियां कलहाला हाच खरा उचित काल
चेतवुनी ते पतंग सोडुनि दिधले खुशाल. ६
होउनि बेभान उभय झगडाया सज्ज होति,
धांवधांवुनी प्रहार अन्योन्यावरि करिती;
लढतां लढतां झाले छिन्नभिन्न दोघेही,
वेडेपण तें बघुनी वारा हांसत राही. ७

*    *    *    *

झुंजुनियां आपसांत ते पतंग अज्ञानी
न कळे कोठें गेले वाऱ्यावरि भरकटुनी.
वरचेवर उचमळुनी येत एक मनिं विचार,
कलहाचे चेतक जगिं दुष्ट किती सूत्रधार! ८

गुडगेरी, १३।६।१९३५

# प्रभुचरणीं

[ स्फूर्तिलहरीचें भरतवाक्य म्हणून दयाघन परमेश्वराजवळ माझी एवढीच प्रार्थना आहे. ]

( राग – भैरवी )

मंगलमय विश्व सकल होउंदे दयाळा ! ॥ ध्रु० ॥
ज्ञानरवी उज्ज्वल कर,
उधळूंदे अवनीवर,
तिमिरपटल जगतींचें जाउंदे लयाला. ॥ १ ॥
जीवनार्थ या जगांत
खपती जे बंधनांत
लाभूंदे चिरवांछित मुक्तता तयांला. ॥ २ ॥
लय पावो असुरता,
नांदूदे शांतता,
तोंवरि जगिं मंगलता येइना यशाला.
मंगलमय विश्व सकल होउंदे दयाळा ! ॥ ३ ॥

बुधगांव, १५।११।३५

# शुद्धिपत्रक

| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ७ | १० | पूर्वांचें | पूर्विंचें |
| १० | ३ | तया भीतरीं | तयाभीतरीं |
| ११ | ९ | मोटारही | मोटारहि |
| १३ | ७ | निस्वार्थ | निःस्वार्थ |
| २० | ९ | असूं दे | असूंदे |
| ४५ | ५ | अधपात | अधःपात |
| ४५ | ८ | किति | किती |
| ४७ | १८ | मिसळूनि | मिसळुनि |
| ४८ | ३ | स्वतचे | स्वतःचे |
| ५८ | १ | साम्राज्यमर्द | साम्राज्यमर्दे |
| ६२ | १ | शिरावरी | शिरावरि |
| ६४ | १३ | डोलांत | डौलांत |
| ७३ | १६ | म्हणुनि | म्हणुनी |
| ७३ | २० | पिटुनि | पिटुनी |
| ७६ | १२ | खळाखळा | खळखळा |
| ७८ | १५ | वदनकांती | वदनकांति |
| ८६ | २ | समाजीचत्र | समाजचित्र |
| ८६ | १३ | वाणा | वाणी |

[ यांशिवाय कांहीं अनुस्वार व ऱ्हस्वदीर्घ यांच्या चुका नजरेंतून निसटल्या असणेचा संभव आहे. ]

---